# लेनिन आणि इतर गोष्टी



[ वरील गोष्टींचा तपशील शेवटच्या पानावर दिला आहे. ]


अडीच रुपये

प्रथमावृत्ति मे-दिन १९४५

प्रकाशकः- शंकर वा. कुळकर्णी, महाराष्ट्र ग्रंथ भांडार, मुंबई.

मुद्रकः- व्ही. के. पडवळ, प्रदीप प्रिं. प्रेस, विजयनगर, दादर मुंबई.

लेनिन आणि स्तालिन
यांच्या नेतृत्वाखालीं
नवी मानवता निर्माण
करून जागतिक राष्ट्रांस
दास्यविमोचनाचा मार्ग
दाखविणाऱ्या सोविएत
जनतेस—

कला ही जनतेची आहे. तिचीं पाळेंमुळें सर्वत्र जनतेंत खोलवर व विस्तृतपणें रूजलीं गेलीं पाहिजेत. तिनें जनतेच्या भावना, विचार व आकांक्षा यांचा मेळ घातला पाहिजे, जनतेला प्रगतीपथाकडे नेले पाहिजे.

—लेनिन

एखाद्या तज्ञ इंजिनियराप्रमाणें लेखक हा सुद्धां मानवी भावनांची उभारणी करणारा निष्णात कारागीर असतो.

—स्तालिन

जी कलाकृति आपापल्या युगांतल्या सत्याशीं, वास्तवतेशी व मानवतेशीं खरोखरी समरस होते ती आपला अविष्कार करण्यासाठीं आपली स्वतःची स्वतंत्र रीत शोधून काढते, आपापल्यापरी स्वतंत्ररूप धारण करते, आपली कामगिरी बजावण्यासाठीं आपलें स्वतःचें एक वेगळेंच जग निर्माण करते. जी कलाकृति अशी समरस होत नाहीं; जीवनाच्या वास्तवतेपासून स्वतःची फारकत करुन घेते, तिला उतरती कळा लागते, ती पोकळ ठरते.

—श्रीपाद डांगे

# संप     १

ओकीला अजून कांहीं तशी संवय झाली नव्हती.

पोलिसांच्या स्वाऱ्या तिच्या घरावर चाल करून येत आणि प्रत्येक वेळेस त्यांना पाहतांना ती बिचकत असे.

तिच्या नवऱ्याचे मित्र ट्रेड युनियन ऑफिसांतून त्याच्याकडे येत असत. ओकी त्यांना चहा देत असे. तिनं आपल्या नवऱ्याला नेहमी बोलतांना ऐकलं होतं कीं, ' अरे बाबा, पण मी माझ्या बायकोला कांहीं एकदम बदलूं शकत नाहीं. ' आणि मध्येंच कोणीतरी म्हणत असे, ' क्रांति स्वयंपाक घरापर्यन्त पोंहच-विलीच पाहिजे पण त्यां बाबतींत तूं निष्काळजी दिसतोस बुवा ! '

' हो तसं असेलहि. पण तुलासुद्धां यांत यश येणार नाहीं. अरे ती सनातनी आहे. '

' याचं कारण हेंच कीं तूं अगदीं सरळमार्गी आहेस. ' अेक मित्र म्हणाला.

रिनकिचीनं एक उसासा टाकला आणि तो आपल्या या कमतरतेवर हंसला. लाजला.

एकदां सकाळीं रिनकिची दांत घासत होता. आणि त्याच्या बायकोनं ऊन पाण्याच्या बंबांतून पाणी सोडण्यास सुरवात केली. तोंडांत टूथ ब्रश तसाच ठेवीत त्यानं विचारलं, ' तुला माहित आहे रोझा कोण आहे तें ? '

' रोझा—पुरुष कीं स्त्री ? रोझा ! मला लेनिन माहीत आहे. पण रोझा ? अं. हं—मला कांहींच कल्पना नाहीं बाई त्याची. खरंच सांगाना कोण आहे रोझा ? '

ओकीनं रोझाच्या ऐवजीं लेनिन नि मार्क्सचं नांव ऐकलं होतं. आपल्या लहानग्या युकिकीच्या तोंडून आणि ट्रेड युनियनच्या कुदू, सांकानिशीं, सांझो-मोटाकडून नेहमीं नेहमीं उच्चारल्या गेलेल्या त्या दोन नांवाचं तिनं अगदीं पाठांतर केलं होतं. एकदा तिनं आपल्या नवऱ्याला विचारलं, ' काय मार्क्स हा कामगारांचा देव आहे ? '

तो मान हालवित हंसला नि म्हणाला, 'तुला कसं समजलं.' पण तिला मात्र आपण विचारलेल्या प्रश्नावर तो कां हंसला तें कांहीं कळलं नाहीं.

आणि सामुदायिक संपाला सुरवात झाली. ओकिला निरनिराळ्या बातम्या ऐकूं येऊं लागल्या. ती जें कांहीं ऐकत असे त्यांतलं तिला कांहींच कळत नसे. तिला आश्चर्य वाटत असे. कुदू आणि सांझोमोटो हे येवढं भयंकर आंदोलन माजवितात तरी कसं ? आणि एकदां तिच्या नवऱ्यानं तिला विचारलं होतं, ' तुला काय वाटतं, संप श्रीमंतांवर आपत्ति आणतो कीं गरीबांवर ? ' त्याचं उत्तर देणं तिच्या आवाक्याबाहेरचं काम होतं.

प्रत्येक दिवशीं मोठमोठ्या मथळयाखालीं संपाचा वृत्तांत छापून येत होता.

साऱ्या शहरावर संपाची आपत्ति !

श्रीमंतांच्या घरांदारांची होळी !

पोलिस आणि कामगारांची चकमक !

हजारों जखमी आणि शेकडोंजणांची धरपकड !

आणि दोन प्रमुख कार्यकर्ते कुदू आणि वॉट्री यांना अटक झाली होती.

ओकीला माहित होतं कीं तिचा नवरा साऱ्या रात्रीं ट्रेड युनियनच्या ऑफिसांत जागून काढीत आहे. मजुरांचा व्यवस्थित संप लढविण्यांत तो मोठा भाग घेत आहे. तो एखाद्या रात्रीं मध्येंच घरीं येत असे आणि झोंपेकरितां आसुसलेल्या नजरेनं तो तिला सकाळीं पांचला जागं करण्याची सूचना देत असे. ती त्याच्या बिछान्यालगत बसून तासन्तास त्याच्या चेहऱ्यावर नजर खिळवून बसत असे. पण बिचाऱ्या ओकीला आपल्या नवऱ्याच्या व्यवसायाचा कांहींच अर्थ कळत नसे.

नंतर नंतर चलाख कार्यकर्ते युनियनच्या ऑफिसांतून तिच्या घरीं येऊं लागले, अन् कामगारांच्या प्रभावीं लढ्याची मजा सांगूं लागले मग कुठं तिला कामगारांच्या लढ्याविषयीं सहानुभूति वाटूं लागली.

आतां तिला समजूं लागलं कीं तिचा नवरा आणि त्याचे सहकारी महत्तम काम करीत आहेत. त्यांच्या कार्यावर तिचा विश्वास बसला. पण त्यांत यश मिळेलच असं तिला वाटत नसे.

त्याच्या तिसऱ्या कारावासानंतर रिंनकिची मास्तरकीच्या नोकरीवरून सुटला. बेकार झाला. मग त्यानं उपजिवीकेचं साधन म्हणून एक फळाचं दुकान मांडलं. हें असं जीवन काढावं लागणार याची कल्पना ओकीला पहिल्यापासून होतीच. अश्रू कांहींच काम करूं शकत नाहीं हें बघून तिनं मूकता स्वीकारली.

रिनकिचीला आतां बराच वेळ मिळाला. अन् तो पहिल्यापेक्षां जास्त उत्साहानं ट्रेड युनियनचं काम बघूं लागला.

—पण तितकाच जास्त पोलिसांचा ससेमीरा त्याच्या पाठीमागं सुरु झाला.

—ओकीनं बघितलं सी. आय. डा. चा पोलिस दुकानासमोर घिरट्या घालीत आहे. ती घाबरली. जास्त बाअीट दिवस येणारच होते. कशाका रितीनं होईना. पण एके दिवशीं तो पोलिस दुकानांत शिरला. त्यानं रिनकिचीला पोलीस स्टेशनवर चलण्याचा हुकूम बजावला.

या पोलीसांच्या भितीला ओकी कांहीं धरबंध घालूं शकली नाहीं. पोलिस दिसला कीं रिनकिची तिचं समाधान करी.

पंधरा मार्चच्या सकाळीं ओकी एका धक्क्यानंच जागी झाली. पुन्हा तपासणी! पोलिसांनी रिनकिचीला पुढं केलं आणि आपल्या बायकोशीं एक शब्दहि न बोलूं देतां ते त्याला घेऊन गेले.

ओकी भीतीनं कापूं लागली.

सकाळचे तीन वाजले होते. थंडीनं दांतखीळ बसत होती.

पांचसहा माणसें बर्फांतून धडपडत चालली होतीं. ती सर्व माणसं युनियनच्या हॉलपाशीं आली. हे सर्व पोलिस होते. त्यांचे पट्टे आणि वेळ्या त्यांच्या हातांत होत्या.

कांहींहि विचार न करतां अन् रिवाजाप्रमाणें जोडे बाहेर न काढतां ते हॉलमध्यें शिरले. ते येण्याच्या एकच तास आधीं युनियनचे सभासद झोंपीं गेले होते. आणि झोंपण्याच्या आधीं सशस्त्र सैनिकांना तोंड देण्याकरितां १५ मार्चची तारीख नियोजित केली होता. त्याप्रमाणें सभासद नोंदणीचं काम झालं होतं. पोस्टर्स भिंतीवर डकविलीं गेलीं होतीं. वादविवादानंतर साऱ्या सभासदांनीं ठरावीक मुद्दे निर्णयांत काढले होते.

आत्तांच दोन वाजतां कार्यवाही समिति एकत्र आली होती. सारी तयारी जय्यत करून ठेऊन कार्यकर्ते झोंपीं गेले होते.

त्यांच्या आंगावरचीं पांघरूणं ओढलीं गेलीं. ते जागे झाले. तपासणी सुरू झाली.

सारे सभासद हा अनपेक्षित हल्ला पाहून हताश झाले. आणि एकहि शब्द न बोलतां ते उभे राहिले.

सांझोमोटो तर फिकाच पडला होता त्याला या प्रकाराची थोडीशी धास्ती होतीच पण त्याला त्यांतहि आशा होती. तो ओरडला, 'टनकाच्या प्रतिकारी सरकारविरुद्ध ज्या कॉमरेडस्नीं भाषणें केलीं आहेत, त्यांना आतां ही कुत्रीं धरून

नेणार वाटतं. आणि ह्या लाळघोट्यांकडून आम्ही दुसरी अपेक्षा तरी कोणती करावी.'

सांकानिशी ज्याला डॉन क्विसोट म्हणत असत. तो अजुनहि अर्धवट झोपेंत होता. त्यानं आलेल्या अगांतुकांपैकीं एकाला विचारलं, 'बरं आतां काय काम आहे तुमचं ?'

'मला माहित नाहीं.'

'तुम्हांला माहित नाहीं तर येथून चालते व्हा.'

पोलिस अधिकारी स्तब्ध झाला. आणि पोलिस पुस्तकांची नि कागदांची तपासणी करण्यांत गर्क झाले.

'तुम्हांला राजकारणांत ढवळाढवळ करायला सांगितलं आहे कुणी ? सारी चूक तुमचीच आहे. ती तुम्हांला भोगली पाहिजे.' पोलिसांपैकीं एकजण हें इतक्या जोरांत बोलला कीं तें साऱ्या जणांना ऐकूं गेलं ?

सोंझोमोटो त्या पोलीसावर दृष्टि रोखीत म्हणाला, 'चूप बैस मुर्खा. तुझं कांहींच ऐकायचं नाहीं आम्हांला !'

वॉट्री जिन्याच्या पायऱ्या उतरूं लागला होता. हें पोलीसाच्या लक्षांत येऊन त्यानं त्याला थांबवीत म्हटलं, 'कशी जाण्याची हिंमत आहे तें पाहातों आम्हीं.'

सोंझोमोटो वॉट्रीवर बरेच दिवसांपासून पाळत ठेवत होता. त्याला आश्चर्य वाटलं, तो दिवसेंदिवस इतका शांत कां होत आहे. आत्तांच त्याचा चेहरा पांढऱ्या लाडूप्रमाणें झाला होता. तरूण वाट्री युनियनचा अध्यक्ष होता अन नेहमी पहिल्या रांकेंत लढणारा वीर होता पण आतां पोलिसांना प्रतिकार करतांना त्यानं अशी शांत वृत्ति कां स्वीकारावी याचं सोंझोमोटोला नवल वाटलं.

सरतेशेवटीं पोलिसांनीं वॉट्रीसह साऱ्या कार्यकर्त्यांना कैद केलं. सोंझोटो साऱ्यांना मधून मधून धीर देत होता. 'उभे रहा. आपलं धैर्य खचूं देऊं नका.'

तो सोंझोमोटोच्या जवळ गेला नि म्हणाला, 'आपण धीर धरला पाहिजे नाहीं तर......'

'हो असं केलं पाहिजे किंवा......' पोलिसांनीं सोंझोमोटोला बाजूला ओढलं अन् तितक्यांत लाल झेंड्याचें पद कोणीतरी गाऊं लागलं. त्यांपैकीं एकाला बुक्की मारण्यांत आली.

एका कार्यकर्त्यानं पोलिसाच्या दंडाला जोराचा हिसका दिला बुक्यांची परतफेड केली. जोरानं आरडाओरड झाली. मग शांतता. आतां सर्व कैदी खांद्याला खांदा लावून अन् पावलामागें पाऊल टाकून चालूं लागले.

'थांबा, बंधुनों थांबा,' असं म्हणत सोंझोमोटो स्वतः थांबला अन् तो सर्वांना थोपवीत म्हणाला, ' आतां आम्हाला कारण नसतांना जें धरण्यांत आलं आहे त्याचा आम्हीं प्रतिकार करतों. आम्हांला धरपकडीचं कारण कळल्या-शिवाय आम्हीं पाऊल उचलणार नाहीं.'

सारेजण ओरडले, 'हो, हो, अगदीं खरं आहे '

सोंझोमोटोनं वाट्रीकडे पाहिलं पण त्याची शांतता तिळमात्रहि ढळली नव्हती. बिचाऱ्या सोंझोमोटोला पोलिसांनीं घेरलं. कामगार पोलिसांच्या नि सोंझोमोटोच्या मध्यें घुसले.

'तुम्हीं सांगा आमच्या पुढाऱ्यांना कां धरण्यांत आलं आहे तें ?'

'तें तुम्हांला पोलीस स्टेशनवर कळेल. '

'हें उत्तर तर नेहमींचंच आहे. आतां आम्हीं त्या घाणेरडया नि अंधाऱ्या कोठडींत यायला मुळींच तयार नाहीं. !'

पोलिस चिडला नि त्यानं सोंझोमोटोला मारायला सुरवात केली.

एक एक करून कामगारांचा एक मोठा जमाव तयार झाला. पुढाऱ्यां-कडून कामगारांचा थवा पोलिसांशीं भांडूं लागला.

खूप मार खाल्ल्यामुळें दबक्या आवाजांत सोंझोमोटो शिव्या हांसडूं लागला.

पण वॉट्रीनं आतां शांतता सोडली होती. तो ह्या लढ्यांत सामील झाला अन् त्यामुळें सोंझोमोटोला बरंच हलकं वाटलं.

'हें बघा, जोपर्यंत तुम्हीं आम्हांला कारण सांगणार नाहींत तोपर्यंत आम्हीं आमच्या शक्तिसर्वस्वानं लढूं.' वॉट्री मोठ्यानं ओरडून म्हणाला.

इशादा थोडासा दूर उभा राहून आपल्या मित्राकडे बघत होता. चिलडीस त्यांत प्रत्येक्ष भाग घेण्यास कुचरत होता. सोंझोटोची कोणीहि वाखाणणी केली कीं तो गरम होत असे. आणि क्षुल्लकशा प्रतिकाराच्या वेळेस असे देखावे दिसत असत. इशादाला असं वाटत असे कीं अशा लहानशा भांडणांत थोड्यानीं भाग घ्यावा अन बाकीच्यांनीं पुढच्या वेळेकरतां राखीवपणा ठेवावा.

इशादा ह्यावेळेस बराच रागावला होता. या हुल्लडींत वॉट्री मिसळल्यापासून साऱ्या कामगारांना नि कार्यकर्त्यांना धीर आला होता. पण ज्यादा पोलीसांची टोळी आल्यामुळें त्यांना हा फार्म बंद करावा लागला.

आतां पहांट होऊं लागली. कैद्यांना थंडी फारच जाणवूं लागली.

धूम्ररंगी आकाशाखालीं बर्फानं आच्छादलेले रस्ते आतां शांत दिसत होते. इशादा आणि सोंझोटोचे कपडे फारच पातळ होते. थंडीमुळें त्यांचीं शरिरें कांपूं लागली. त्यांचीं बोटं आंकडलीं गेली.

वीस वर्षांच्या इशादानं कांहीं आठवडे आधींच युनियनचीं कामं अंगावर घेतली होती. या धरपकडींत तो अगदींच नवोखा होता. इतरांप्रमाणें त्याला प्रतिकार करावा अन् खूप ओरडावं असं वाटत होतं. पण आतां—

जास्त धरपकड होणार अशीं चिन्हं दिसतांच त्याचा धीर पार निघून गेला.

एकमेकांना बिलगुन सारे कॉमरेड्स् शिस्तींत चालूं लागले. कोणी कुणाशी बोलत नव्हतं. सगळ्यांच्या हृदयांत एक अमोघ शक्ति, दया आणि बंधुत्व याचा प्रवाह वहात होता. सोंझोमोटो, वॉट्री, साकानिशी, डॉन क्विसोट, सोंझोटो, इशादा, निशिबाटा या सर्वांना त्या अमोघ शक्तीची जाणीव होत होती. आणि अशा संकटाच्या वेळेस तर ती शक्ति जास्त प्रमाणांत काम करीत असे. आणि त्यांत गांभीर्याचा वेग !

पुढाऱ्यांचं हेंच गांभीर्य कामगारांच्या एकजुटीस आघाडीवर आणण्यास प्रवृत्त करतं.

पहाणारांना असं भासत होतं कीं आतां या व्यक्ति व्यक्ति विलग नसून एक प्रचंड शक्ति एकरूप झाली आहे. आणि त्यांच्या शक्तीनां एक साकार स्वरूप येत आहे.

त्याच्या त्या काळ्याभोर नयनांत एक तीक्ष्ण लकाकी दिसत होती. आणि त्याच्या नजरेची निश्चलता म्हणजेच कामगारांची क्रांति!

'चला उठा' एक पोलिस ओरडला. तो अंधारांत विजेच्या दिव्याचा खटका बघूं लागला. कुदूची तीन मुलं उठलीं अन् रडूं लागलीं. पोलिसांना विजेचा खटका सांपडला नाहीं आणि तो अंधारात तसाच चांचपडत राहिला. शेवटीं तो खटका त्याला सांपडला. त्यानं तो वरखालीं करून पाहिला

'हें असं का दिवा लागत कां नाहीं.?'

'आम्हांला उजेड मिळत नाहीं.' कुदू रागीट आवाजांत म्हणाला.

दोन महिने झाले विजेचा प्रवाह बंद करण्यांत आला होता. कुदूजवळ दिवा आणण्याकरितां सुद्धां पैसे नव्हते. संध्याकाळ झाली कीं तो आपल्या मुलांना शेजारीं झोंपायला पाठवीत असे. आणि तो युनियनच्या ऑफिसची वाट सुधारीत असे.अशा रितिनं त्याला सात आठ दिवस संवय झाली होती.फुटपाथ-वरून जातांना त्यानं एकदां इलेक्ट्रीकच्या सामानाच्या दुकानांत जाहिरात वाचली होती कीं चकाकणारे दिवे घरें सुशोभित करतात. पण याच्या डोळ्या-समोर मात्र काजवे चमकले.

मुलं रडूं लागतांच तो म्हणाला, 'मुलानों चूप बसा ते तुम्हांला कांहीं खात नाहींत.' आणि त्याची बायको अयाशीनेहि मुलांना शांत केलं.

'यांत भिण्याचं कारण काय आहे. हे सभ्य लोक नेहमीच अगांतुकाप्रमाणें आपल्याकडे येत असतात.' नंतर एकामागून एक सारी मुलं शांत झाली आणि त्यांनाहि हा प्रयोग कांहीं नवा नव्हता कुदूच्या मित्रांनीं युनियनमध्यें

सर्वांना सांगून टाकलं होतं कीं, अयाशी आपल्या मुलांना वर्गजागृतीचे धडे देत आहे. आणि खरं सांगायचं म्हणजे ते धडे शिकून मुलं कांहीं शहाणी होत नव्हतीं. सध्याचं त्यांचं जीवनच त्यांना सर्व शिक्षण देत होतं.

अयाशी उभी होती. तिनं हात गुडघ्याला टेकले होते. ते तिला जड आणि मोठे भासूं लागले. तिचे हात घरकामामुळें घाण झाले होते. तिला त्याची शुद्ध नव्हती.

तिनं आपल्या लहानशा आयुष्यांत एकदांच आपले शत्रू कोण आहेत ते ओळखून ठेवले होते. आणि नवरा युनियनमध्यें जाऊं लागल्यापासून तर तिच्या डोक्यांत बराच प्रकाश पडला. युनियनच्या वाढत्या कामामुळें कुडू आठवडा न् आठवडा घरीं परतत नसे. मग अयाशीला एकटीलाच कामं करावी लागत. ती सर्व करीत असे. कोळशाची ओझीं डॉकमधून खालीं घेण्याचं काम ती करीत असे. आणि भाजी नि बटाट्यानीं भरलेली पोतीं शिवीत असे. कधीं कधीं तिला वेताच्या कारखान्यांत कामं करण्यास आनंद वाटत असे. तिसरा मुलगा व्हायच्या आधीं अगदीं शेवटपर्यंत ती कोळशाच्या थैल्यांची नेआण करण्याचं काम करीत असे.

कुडूच्या खोलींत भिंतीवर कागद चिकटवले होते. आणि ते जुने झाल्यामुळें सारे पिवळे पडले होते. आणि कांहींना चिरा पडल्या होत्या. वारा आला म्हणजे त्या पोकळींतून फड फड आवाज होत असे. अयाशीजवळ नवीन कागद घ्यायला पैसे नव्हते. ती युनियनमध्यें जात असे. आणि कामगारांच्या बातमीपत्रांचा गठ्ठा उचलून आणून ती बातमीपत्रें चिरा पडलेल्या ठिकाणावर चिकटवून टाकीत असे. आणि अशा रीतीनं आतांच सुरू झालेल्या संपाची विस्तृत माहिती तिच्याकडून साऱ्या भिंतीवर झकविली गेली होती.

फावल्या वेळांत ती त्या कागदावरचा मजकूर वाचीत असे. आणि आपल्या मुलांना त्याचा अर्थ समजावून देत असे. एकदां कुडू, वॉटी नि सोंझोमोटो त्या खोलींत आले होते. साऱ्या भिंती न्याहाळून बघितल्यावर त्यांना भलताच आनंद झाला. आणि त्यांच्यापैकीं एकजण म्हणाला, 'आतां कोण म्हणेल हें आमचं घर नाहीं म्हणून.'

कुदू उठला. त्यानं कपडे केले.

तो तुरुंगवास भोगीत असतांना त्याच्या बायकोनं नि मुलांनीं जगावं कसं ?

जेव्हां जेव्हां तो धरला जात असे तेव्हां तेव्हां हा वरील विचार त्याच्या मनांत येत असे. आपल्या युनियनमध्यें सहकाऱ्यांत काम करीत असतांना तो हा विचार टाळीत असे. पण तो एकटा असतांना पुन्हां तोच विचार त्याला भंडावून सोडीत असे.

अयाशी त्याचं सामान गुंडाळीत आणि त्याला धीर देत म्हणाली, ' आमच्याबद्दल तुम्ही मुळींच काळजी करूं नका. आमचं आम्हीं पाहूं. '

वडील मुलाला या चाललेल्या प्रकाराची थोडीशी जाणीव होती. तो पळत पळतच आपल्या बापाकडे आला नि म्हणाला, ' बरं, बाबा, लवकर या हं. बाय बाय. '

पोलिसाला या सर्व प्रकाराचं आश्चर्य वाटलं. 'केवढं हें अशाधारक नि खेळीमेळीनं राहणारं कुंटुब !' तो स्वतःशींच पुटपुटला.

' जर आम्हीं प्रत्येक वेळेस असंच करूं लागलों तर मग चळवळींत काम करायला वेळ मिळणार कसा ! ' कुदू सहजच उद्गारला.

' ए ऽ ऽ मूर्खा जर पुन्हां तूं त्या चळवळींसंबंधीं बोललास तर तुला येथेंच गुद्दे देईन लक्षांत ठेव. ' पोलीस ओरडला.

कुदूला आपल्या बायकोशीं कांहीं तरी जास्त बोलायचं होतं पण त्याच्या तोंडून शब्दच निघाले नाहींत. ' अगदीं धीर सोडूं नका. आम्हीं कसं तरी भागवून घेऊं. ' त्याला धीर देत अयाशी म्हणाली. तिनं आपल्या नवऱ्याकडे बघितलं. तो स्तब्ध होता. त्यानं फक्त मान हालवली आणि पोलिसामागें चालूं लागला.

ओकीला अयाशीकडून असं कळलं कीं या वेळेस कधींही झाली नाही इतकी धरपकड झाली आहे. एखाद्या खोक्यांत खिळे भरावेत तसे लोखंडकाम

करणारे कामगार तुरुंगांत भरले गेले. डॉकयार्डवर पांच दहा माणसें तरी धरली जात होतीं. आणि या धरपकडींत कितीतरी विद्यार्थी डांबले गेले.

सेटो नांवाचा एक कारकून दोन दिवस आधीं धरला गेला होता. साऱ्या कार्यकर्त्यांबरोबर प्रत्येक गुरुवारीं तो रिंचीला भेटत असे. तो आपल्या म्हाताऱ्या आईबरोबर रहात असे. तिनं आपल्या हाडाचीं काडं करून सेटोला कमर्शियल कॉलेजांत शिकविण्याकरितां पैसे कमाविले. तिला आशा होती कीं कोणत्या तरी कंपनींत किंवा बँकेंत त्याला मानाची जागा मिळेल. आणि मग शेजाऱ्यांपाशीं ती आपल्या मुलाची वढाई मारीत जाईल. नंतर तिला जास्त काम करावं लागणार नाहीं, प्रत्येक वर्षी ती आपल्या खेड्यांत जाऊन विश्रांति घेईल. तिला घरभाडें वेळेवर चुकविण्याची काळजी राहणार नाहीं. कुठंतरी पतीवर सामान आणण्याची तिला गरज भासणार नाहीं किंवा एखाद्या सावकाराकडे कर्जाक-रितां तोंड वेंगाडावं लागणार नाहीं. आणि मग साऱ्या अडचणी दूर होतील. ती आपल्या कष्टमय आयुष्यांत हेंच रम्य स्वप्न पाहात आली होती.

शेवटीं सेटो पदवीधर झाला. त्याला नोकरी मिळाली. पहिला पगार घेऊन त्यानं आपल्या आईजवळ दिला. आणि तो तिच्याजवळ बसला. ती त्याच्याकडे एकसारखी टक लावीत पाहूं लागली. आणि जेव्हां स्वैपाकघरात सेटो जेवायला गेला तेव्हां त्याच्या बापाच्या तसविरीजवळ त्याला मेणबत्ती पेटलेली दिसली. त्याची आई म्हणाली, ' हें बघ तुझ्या बापाला तूं आणलेली कमाई दाखवित आहे. '

सोळा मार्चला सेटोनीं ऐकलं कीं रिंचीचे सारे सहकारी युनियनमध्यें पकडले गेले आहेत. सेटो एकदम घरीं आला. त्यानं पुस्तकांचा नि कागदांचा गठ्ठा बांधला आणि त्यांची शेजाऱ्यांकडे रवानगी केली. त्या दिवशीं कांहींच घडलं नाहीं. सेटोला ट्रेड युनियन ऑफिसांत जावंस वाटत होतं. पण मित्रांनीं त्याला बजावलं कीं ती जागा कितीतरी पोलीसांनीं घेरली आहे. तेथं जाणं धोक्याचं काम आहे.

सेटो तेथें गेला नाहीं म्हणून तो आनंदी होता. पण कांहींका असेना. त्याच्या घरींच तो धरला गेला.

संध्याकाळ होऊं लागली तेव्हां ओकीनं अयाशीचं घर सोडलं. आणि ती राजमार्गावरून घरीं जाण्याकरितां मार्ग काढूं लागली. व्हिक्टोरिया, मोटारी, गाड्या, बसेस आणि रिक्शा रस्त्यावरून जातांना तिनं पाहिल्या. एका खिडकींतून एक जोडपं एकमेकांच्या गळ्यांत हात घालून बाहेर रस्त्यावरची मजा पाहात असतांना तिला दिसलं.

ते एकाला एक चिटकून बोलत होतीं. दोघांच्या अंगांत उंची उंची कपडे होते. तरूण तरूणी, लहान लहान मुलं हातांत हात घालून फिरत असताना तिला दिसलीं. हा सर्व देखावा पाहून ओकीला जास्त वाईट वाटूं लागलं. तिकडे हजारों लोक आपल्या जीवनाचा बळी देत आहेत कशाकरितां ? आणि हं ?.......काय...कामगारांकरितां ? काय हें खरं आहे ? आणि हें खरं असलं तर काय हे ख्यालीखुशालींत समाधान मानणारे लोक याचा विचारसुद्धां कारत नाहींत. हे लोक कांहींच घडलं नाहीं असं समजून वागत आहेत. ओकी कांहींच समजूं शकली नाहीं. इथं या रस्त्यांत त्या प्रभावी लढ्याचं कांहींच चिन्ह तिला दिसलं नाहीं. तिला वाटलं बहुतेक या रस्त्यावरून जाणाऱ्या लोकांना धरपकडीचं कांहींच कळलं नसावं आणि म्हणूनच हे इतके आनंदी दिसतात. तिचा समज खरा होता. कारण सरकारनं यापुढें धरपकडीची बातमी वृत्तपत्रांत न येईल अशी तयारी करून ठेवली होती.

माझ्या नवऱ्यानं असं कां केलं. अन् कुणाकरितां ? ओकीनं स्वतःलाच प्रश्न विचारला. तिला एकटं रहाणं भयानक वाटलं; सारं जग रिकामं भासलं. तिच्या नवऱ्याचे सारेच मित्र वेडे असतील ! छेः छेः हें अगदीं खरं नाहीं आणि तसं नसलं तर......?

ती सोळा मार्चची तारीख होती. सकाळपासून पोलीसांच्या मुख्य ठाण्यांची दारं उघडत नि बंद होत. पोलीसांच्या जाळीच्या लॉऱ्या निळ्या डगल्यांच्या पोलीसांसह इकडून तिकडे फिरत होत्या. आणि मुख्य

पोलीस स्टेशनाचं मुख्य दार पूर्णपणें उघडें होतं. त्यांतून घटके घटकेला कैद्यांचा थवा आंत ढकलला जात होता. कैद्यांच्या खोल्या खचून भरल्या गेल्या होत्या. आणि प्रत्येक वेळेस त्यांच्या खोल्यांचीं कुलुपें उघडलीं जाउन कैद्यांच्या तोंडांना कुलुपें घालण्याचा उपक्रम चालला होता. वाट्री, सोंझोमोटो, सिझोटा आणि सांकानिशी नव्या नव्या कैद्यांचं स्वागत करीत होते. कैद्यांना पहातांच रखवालदाराचे डोळे खदीरांगारासारखे लाल बनत होते. ते एकत्र असेपर्यंत सारेजण करमणूक करून घेत होते.

सोंझोटो भिंतीवर आपटण्याचा नाच खेळत होता. मग तो ओंठ दाबून गाल फुगवीत मोठयानं ओरडून एका पोलीस अधिकाऱ्याची नक्कल करूं लागला.

'दंगा बंद करा.' बाहेरुन रखवालदार ओरडला. सोंझोटो चिडला आणि त्यानं भिंतीला ठोकरा द्यायला सुरवात केली. त्या लाकडाच्या भिंती तडकल्या. इशादाही त्यांत भाग घेत होता. तो तोंडानं कांहींतरी बडबडत येरझारा घालीत होता. दार पुन्हां उघडून पोलीस सोंझोमोटो आणि वॉट्रीला घेऊन गेले. या दोघां नेत्यांना त्यांच्यापासून दूर नेल्यामुळें सारे लोक गंभीर बनले.

रिंची एका कोपऱ्यांत डोळे मिटून बसला होता. इशादा त्याच्याकडे बघूं लागला. त्याला भीति वाटली. त्याला वाटलं आजच्या धरपकडींत कांहींतरी गंभीर घटना घडली असावी. तो रिन्चीजवळ गेला.

'कॉम्रेड रिन्ची.'

रिंचीनं डोकं वर केलं.

'कॉम्रेड, हे सारे काय प्रकार चालले आहेत.'

'मला स्वतःलाच हें आधीं समजलं नाहीं.'

'मी वॉट्रीला विचारण्याचा प्रयत्न करीत आहे !'

'सध्यांच्या आपल्या कार्यवाही समितीशीं याचा संबंध असला पाहिजे.

'हो मलाही तसं वाटलं होतं. पण जर तसं असतं तर त्यांनीं आपल्याला एखाद्या दिवसाकरितां कैद केलं असतं पण हीं चिन्हें..........'

दुसरे सारे कैदी रिंची भोंवतीं जमा झाले आणि रिंचीचं सारं भाषण ते ऐकूं लागले. त्यांना असं कळलं कीं कांहींही कारण नसतांना कार्यकर्त्यांना एखाद्या पक्षाप्रमाणें तुरुंगांत बंद करून टाकीत आहेत.

रिंची पुढें बोलूं लागला.

'......हें बघा कायदा असा आहे कीं घर मालकाच्या परवानगीशिवाय कुणालाही आंत शिरण्याची मनाई असते. घरांत राहाणाऱ्या लोकांच्या इच्छे-विरुद्ध जर कोणी घरांत शिरला तर त्याला कायद्यानं शासन करण्यांत येतं, जर घरांत राहाणाऱ्या लोकांची संपत्ती, आरोग्य, जीवन आणि संतती धोक्यांत असेल तरच कोणीही आगंतूक ह्या लोकांच्या घरांत शिरून त्यांना मदत करूं शकतो.

'आणि हा कायदा सर्वांना लागू आहे मग तो जुगारी असो कीं कोणी प्रतिष्ठित असो. पण आमच्या बाबतींत मात्र अन्याय होत आहे.

'कायदा जाणणाऱ्या त्याच लोकांनीं आमच्या घरांवर मध्यरात्रीं हल्ले केले. आम्हीं शांतपणें झोंपलों असतांना आम्हाला कांहींही कारण न सांगतां पकडलं. अशा रीतीनं हे समंजस कायदेतज्ञ कायदा मोडून नागरीकांना धडे देत आहेत.'

रिंचीच्या भाषणांला कैदी मधून मधून टाळ्या देत होते. रिंची म्हणाला, 'बंधुनों, आपल्या सरकारी कायद्यांत असे नियम आहेत कीं कोणत्याही माणसाला कांहीं कायदेशीर कारण असल्याशिवाय शिक्षा देतां येत नाहीं. पण बघा, आतां त्रांगडं कसं फिरलं आहे. त्यांच्या कायद्याच्या नि शिक्षेच्या कचाट्यांत आम्हीं सांपडूं असं तर आम्हीं कांहींच केलं नाहीं. मग आम्हांला चौकशी आणि शिक्षेशिवाय कां तुरुंगांत डांबून ठेवलं आहे? आमच्यावर लादण्यांत आलेले कायदे आणि नियम निव्वळ खोट्याचं आणि फसवेगिरीचं एक जाळं आहे.'

त्याचं हें म्हणणं ऐकतांच कैद्यांना आपल्या हक्काची तीव्र जाणीव झाली. आणि एक तार छेडतांच दुसऱ्याही तारा छेडल्या जाव्यात त्याप्रमाणें त्यांची ती सूड वृत्ती बळावली. त्यांच्यापैकीं एक म्हणाला, 'मला वाटतं आपण दार

मोडून बाहेर निघूं, पोलीस अधिकाऱ्यासमोर जाऊन उमे राहूं अन् त्याला विचारूं आम्हांला कां धरण्यांत आले आहे तें ! '

' हो चला ? आपण आतां मोठयानं ओरडूं या. '

' याचा कांहीं उपयोग होणार नाहीं ? ' रिंची म्हणाला.

' कां उपयोग होणार नाहीं ? ' सेटो उसळून म्हणाला. ?

' आतां यांत कांहीं अर्थ नाहीं. आम्हीं बंदिस्त आहोंत. आम्हीं जर हुल्लड माजविली तर वाईट प्रसंग पुढें उभे राहतील आणि त्यांतच पुढें आपल्या कामगार चळवळीच्या नाशाचं बीज पेरलं जाईल. आमची चळवळ आणि ही बातमी साऱ्या जनतेला कळली पाहिजे. आम्हांला साऱ्या कामगारांचा पाठिंबा मिळाला पाहिजे.

' आणि तसं झालं म्हणजे आतां तुम्हीं जी युक्ति योजीत आहां ती त्या वेळेस सफल होईल. इथं गोंधळ माजवूं नका. ते आपल्या मतप्रणालीच्या विरुद्ध घडेल.'

' पण आम्हीं इथं शांतपणें कांहींही न करतां बसावं कसं ? काय आम्हीं नुसतीं प्रवचनें ऐकत बसावित आणि कृती कांहींच करूं नये ? '

हा संवाद चालू असतांना एक चौकोनी चेहऱ्याचा नि लांब दाढीचा पोलीस आंत आला. आणि त्यानं सेटोला दम देण्यास सुरवात केली.

तो प्रत्येकाला ठोसा देऊं लागला. सेटो त्याच्या तावडींतून सुटला आणि त्याच्या पाठीमागें जाऊन उभा राहिला, सेटोनं त्याच्या पाठीवर इतक्या जोरांत ठोसा लगाविला कीं तो पोलीस धपकन् भिंतीवर आपटला. त्यानं शिव्या हांस-डीत सेटोवर बदला घेतला आणि मग दमून थंड उसासे टाकीत म्हणूं लागला, ' लक्षांत ठेवा तुम्हांला या उद्दामपणाची भरपाई करावी लागेल. '

दुसऱ्या पोलीसानं येऊन यादीवरील नांवांचा पुकारा केला. भराभरा हांका मारलेले लोक निघून गेले. आतां त्या खोलींत सहाच कैदी शिल्लक राहिले. सेटोनं उभं राहण्याचा प्रयत्न केला पण पोलीसांनीं गुद्दा देऊन त्याला खालीं बसविलं.

त्या सहा माणसांवर देखरेख ठेवण्याकरितां कांहीं रखवालदार पाठविले गेले. आणि त्यांचं संभाषण अजिबात बंद करण्यांत आलं. रिंची एका मोठ्या गजाच्या भिंतीजवळ बसला होता. त्या रात्रीं रिंचीचं डोकं दुखूं लागलं.

दिवस उगवला. पावलं वाजूं लागलीं. शेजारच्या खोलींतून एका कैद्याला बळजबरीनं ओढून नेण्यांत आलं.

रिंची जागा झाला. सकाळचा धूसर प्रकाश खोलींत पडला. एक डोळे चोळूं लागला तर दुसरा डोक्यावर हात ठेवून बसला. अन् तिसरा खिडकींतून बाहेर पाहूं लागला. सारे जागे झाले.

प्रत्येक वेळेस रिंची जेव्हां तुरुंगांत जात असे तेव्हां त्याला आपल्या लहानग्याची आठवण होत असे. आणि या आठवणीमुळें त्याला फारच थकवा भासत असे. त्याला माहित होतं कीं आपल्याचप्रमाणें या सार्‍या कार्यकर्त्यांच्या कुटुंबाची धरपकडीनंतर अशीच वाताहात होत असेल. पण ती भीति क्षणीक होती. ती त्याच्या चळवळीची शत्रू होती. त्यानं या विचारांना दूर सारलं.

आतां रखवालदाराची पाळी बदलली. नवीन रखवालदारांपैकीं सान्दा, रिंचीजवळ आला. तो त्याला बरेच दिवसांपासून ओळखत होता. अन् रिंचीला धरून आणण्याची कामगिरी नेहमीं तोच बजावित असे. 'रिंची, या धरपकडीमुळें आम्हां पोलीसांना फार त्रास होत आहे. आमच्या फुरसतीच्या वेळेसमुद्धां आम्हांला बोलाविलं जातं आणि आम्हीं कितीही थकून गेलों असलों तरी आम्हांला जावं लागतं.' रिंचीला या सान्दाच्या बोलण्याचं आश्चर्य वाटलं तो त्याच्याकडे बघूं लागला.

'मला तुमच्याबद्दल वाईट वाटतं' रिंची म्हणाला. आणि दुसरा पोलीस जेव्हां खोलींतून बाहेर पडला. तेव्हां सेटो सख्याळपणें म्हणाला, 'तुमच्याबद्दल मला पण वाईट वाटतं.' दुसरे पोलीस जाईपर्यंत सान्दा थांबला. आणि नंतर त्यानं रिंचीला विचारलं.

'तुझ्या ओकीला कांहीं निरोप द्यायचा आहे काय?'

रिंची थोडा वेळ स्तब्ध राहिला, अन् पोलीसावर दृष्टी रोखीत म्हणाला, ' नाहीं, तूं आपलं काम कर. '

सकाळीं सेटो तोंड धुण्याकरीतां नळावर गेला. त्याला नळाजवळच्या खिडकीतून हॅलो, हॅलो, हा आवाज ऐकूं आला. सेटो थांबला. तो आवाज वॉट्रीचा होता. वॉट्री लोखंडी गजावर चेहरा ठेवून उभा होता.

' वॉट्री तूं इथं आहेस. '

' हो मी एकटाच आहे इथं. '

' अन् बाकीच्यांना कुठं ठेवलं ? ' पोलीसांनीं शिव्या देत चूप बसण्याचा इशारा केला.

सेटोला वाटलं वॉट्रीला एकांतीक कारावास कां मिळाला असावा ? त्याला एकट्यालाच खोलींत कां ठेवलं असावं ? आणि या साऱ्या गोष्टींमागें आहे तरी काय ? सेटोला आपल्या सहकाऱ्यांच्या आयुष्याचा कांहींच थांग लागेना. सेटो परतला. त्यानं तेच प्रश्न रिंचीला विचारले. पण रिन्चीनं त्याचं म्हणणं ऐकून घेतलं नि ओंठ चावले.

इशादा सुद्धां त्याच जागेवर वॉट्रीला भेटला. तो त्याच्याशीं बोलूं शकला नाहीं. वॉट्रीचा चेहरा शांत आणि गंभीर होता.

परत आल्यावर इशादानं रिंचीला विचारलं. ' बोना क्राफ्ट माहित आहे कोण आहे तो ? '

' नाहीं. कोण आहे तो कम्युनिस्ट ? '

' अं हं तो एक अभिजात नट आहे. '

' म्हणजे तुला भांडवलदार मित्रही आहेत तर ! '

पण खरी गोष्ट अशी होती कीं वॉट्रीचे हावभाव पाहून इशादाला बोना क्राफ्टची आठवण झाली. त्यानं न्यु यॉर्क डॉककामगारांच्या प्रश्नाला वाहिलेल्या एका चित्रपटांत नायकाची भूमिका उत्कृष्टपणें बजाविली होती. चित्रपटांत त्याचं

काम पाहून इशादाला वाटलं अगदीं तसंच वॉट्रीसुद्धां आपल्या कामगारांच्या चळवळींत एखाद्या अभिजात नटाप्रमाणें संकटाशीं झुंज खेळत, शांतपणें आणि गंभीर मनानं तो नायकाची उत्कृष्ट भूमिका अप्रत्यक्षपणें कां होईना बजावित आहे.

इशादानं वॉट्रीवर केलेली टीका ऐकून रिंचीला आठवण झाली. त्यानंही एका चित्रपटांत धीर गंभीरपणें आपल्या ध्येयवादी कार्याला तोंड देण्याऱ्या एका नायकाच्या बायकोची भोळेपणाची उत्कृष्ट भूमिका पाहिली होती. आणि ज्या नटीनं तें काम केलं होतं तिचं नांव होतं रोझा !

त्याला त्या रोझाचं पात्र फारच आवडलं होतं. ती रोझा आणि त्याची ओकी अगदीं एकच आहेत असं त्याला वाटत असे. आणि म्हणूनच त्यानं त्या दिवशीं ओकीलाही असाच प्रश्न विचारला होता.

" तुला माहित आहे रोझा कोण आहे ते ? "



# करंगळी ∴ • • • २

तारा आणि तारायंत्रें !

खांबावरील तारा, जमिनीखालील तारा, बिनतारायंत्रें, ह्या सर्व तारा जगभर पसरल्या आहेत.

टेलिफोन्स आणि टेलिग्राम्स् !

अगणित तारा आपल्या डोक्यावर आणि पायाखालीं पसरल्या आहेत.

साऱ्या शास्त्रज्ञांनीं आपल्या अकलेचे तारे तोडून ह्या भांडवलदारांच्या सोयीकरितां तारायंत्रांची युक्ति शोधून काढली.

ते आपल्या धोकेबाजपणाचं गाठोडं उकलून त्यांत कामगारांचे श्रम आणि अनन्वित जाच बांधून ठेवित आहेत.

एका शहरांतल्या विभागांतील ती रमणीय संध्याकाळ आहे. टेलिफोनच्या खांबाच्या ओळीच्या ओळी दूरवर पसरलेल्या दिसत आहेत. आणि वाऱ्याच्या घर्षणानं त्या तारांतून गोड झंकार उत्पन्न होत आहे.

पोष्ट ऑफिसजवळ एक तारेचा मोठा खांब आहे. कुठंतरी तारायंत्रांत बिघाड झाला म्हणजे त्या खांबावर ती चूक सुधारण्यांत येते. त्याला " टेस्टिंग–पोल " म्हणतात. त्यावर चढण्याकरितां शिडया आहेत. टोकीमोटो हा तारकामगार लाईन बंद झाली म्हणून दुरुस्तीकरितां वर चढला आहे. त्यानं आपला रिसिव्हर तारेवर जोडून मुख्य ऑफिसमध्यें विचारण्याकरितां ठेविला आहे.

त्यानं पहिल्यान्दा वरच्या बाजूला जाणाऱ्या लाईनवर फोन केला. त्यांतून त्याला दबका आवाज ऐकूं आला.

' मी म्हणतों माझं बोट '

दुसऱ्या कुणाच्या तरी टेलिफोनवरून चालणाऱ्या बातमीची नि याच्या बातमीची टक्कर झाली असावी आणि त्याला दुसऱ्याचं चाललेलं संभाषण ऐकूं येऊं लागलं.

' बोट, अगदीं लहान बोट म्हणजे करंगळी. तो म्हणतो तें तो तुमच्या संस्थेकरितां देऊं शकेल. '

त्या विलक्षण संभाषणांत त्याला मजा वाटली. तो आपलं काम बाजूला ठेवून तें संभाषण ऐकूं लागला.

' मग ती करंगळी तुम्ही केवढ्यांत विकत घ्याल ? ' निराळा आवाज.

' मला वाटतं बहुतेक......चांगला देखावा होईल. कापा......चाकू.... आणि एक भाषण...... ' पहिल्या दबक्या आवाजांतून त्याला वरील असंबद्ध शद्ब ऐकूं आले.

पुन्हां त्याला स्पष्टपणें ऐकूं आलं.

' संस्कृतीसंघाच्या खर्चाचं काम शंभरच्या आंत होऊं शकेल... नको नको या फोनवर कांहींच सांगूं नका. तुम्हीच माझ्याकडे आल्यास बरं होईल.'

' बरं....तर मग तो मनुष्यच मी तुमच्याकडे घेऊन येतों. '

आतां टोकीमाटोला कांहींच ऐकूं आलं नाहीं करंगळीचा आणि संस्कृती संघाचा काय संबंध असावा. त्याला कळलं नाहीं. त्याला आपल्या कामाची

आठवण झाली. आणि एकसारखा रिसिव्हर धरल्यामुळें त्याच्या हाताला कळ लागली.

त्या तारांच्या जाळ्यांतून निनादणारा आवाज आणि सामुदायिक बातम्यांच्या आवाजाचा त्याच्या कामांत पार्श्वसंगीतासारखा उपयोग होत होता.

'संस्कृतीसंघ आणि करंगळी.......' हें तो विसरूं शकला नाहीं. कोणता हा संस्कृतीसंघ आणि काय असावी त्याची संस्कृति. या तारखात्याच्या कामगारांना त्यांत जागा असेल काय ? आणि असली तर त्यांच्याकरितां ही करंगळीची काय सबब असावी. ह्या संस्कृतीसंघाचा नी इंपीरीयल टोबॅको मॉनापल्ली ब्युरोचा कांहीं परस्पर संबंध असेल काय ? अगदीं बरोबर; त्यांत बोटाचा संबंध असतोच. सिगरेट कारखान्यांत कामगारांच्या चलाख बोटांचा नि मालकांच्या फायद्याचा संबंध असेलच–असलाच पाहिजे.

टोकीमोटोला आठवलं, तीनचार दिवसांनंतर त्याला अशाच एका संस्कृती संघात दाखल व्हावयाचं होतं. आणि कारखान्यातले बरेचशे कामगार व इतर लोक त्या संघांत दाखल झाले होते. आणि ते त्यालाही दाखल व्हावयाला आग्रह करीत होते.

जाऊंद्या त्या गोष्टी, आतां तर त्याला काम करण्याची निकड होती.

वरच्या अनुरोधानं बातम्या येणाऱ्या तारांत कांहींच फरक पडला नव्हता. म्हणून त्यानं आपला रिसिव्हर खालून येणाऱ्या तारेवर बसविला.

' अरे रिसीव्हर जोडलास कुठं ? खालीं जाणाऱ्या तारेवर कीं वरच्या तारेवर ! ' खालीं उभे राहिलेल्यांपैकीं एका मित्रानं विचारलं.

' खालच्या बाजूनं. ' तो उत्तरला आणि चूप राहिला. वारा जोरांत सुरू झाला. त्याला तेथं दुरुस्ती करायला जास्त त्रास पडूं लागला. ' आजचं वारं फारच वाईट आहे. ' तो खालीं जमलेल्या मुलांना उद्देशून ओरडला. खांबावर उभा राहिल्यामुळें त्याची पाठ खांबाला चिकटली होती. शहर अंधारांत झाकून गेल्यासारखं दिसत होतं. एका बाजूला हिरव्या रंगाची

पोष्टची इमारत आणि आतां आपल्या वर्णनाला स्वल्पविराम द्यायचाच झाला तर तो उभा असलेला त्याचा खांब.

माणसा तुझ्याकरितां हें असंच आयुष्य आहे. हीं खांबं आणि त्यावरील सारी व्यवस्था हेंच तुझं काम आहे. आम्हांला असल्या गोष्टी पसंत नसल्या तरी पण तुझी उपजीविका तर त्यावरच अवलंबून आहेना !

" वारा, धूळ. "

टोकीमोटो काम करण्याकरितां खांबालगतच्या फळ्यावर उभा राहिला. त्याला कांहींच खरं वाटलं नाहीं. स्वप्नांतल्या संभाषणासारखं एक करंगळी विकण्याची गोष्ट—तो ती पूर्णपणें विसरला.

त्यानं देवाचं नांव घेऊन म्हटलं कीं आतां निदान वादळ तरी न होवो !

त्याच रात्रीं सारूकी टामानो हा दुसरा तारकामगार कामावर होता. तो पोष्ट ऑफिसांतल्या तारकामगारांच्या क्वार्टर्समध्यें झोंपत असे.

त्यानंही रात्रीं त्रास देणारा आवाज ऐकला. पण दिवसाच्या कामानं थकून गेल्यामुळें त्यानं तिकडे डोळेझांक केली

' मला थोडसं जास्त झोपूंद्या. माझी गोड झोंप कोणी मोडूं नका. '

असं म्हणून तो झोंपला. अगदीं गाढ. आणि त्यानं विचार केला कीं कोणीही येवो, त्याला असंच उत्तर द्यायचं आणि पुन्हां आपलं झोंपी जायचं. पण असा विचार करण्यांत हांसील काय ? तो उठला नसता तर त्याला बोलणी खावीं लागलीं असतीं. त्यानं डोळे चोळले, टेलीफोनची घंटा सारखी वाजत होती. ' बस कर. ' तो म्हणाला. आणि त्याला पुन्हां अंथरुणावर पडण्याची इच्छा झाली.

' हॅलो हॅलो, ' या रागीट आवाजानं त्याला पुन्हां भानावर आणलं. शेवटीं त्यानं फोन घेतलाच, ' हें टोकिओ सेंटर ४, ६ नि ७ नंबरची लाईन

बंद पडली आहे. आणि पांचवी लाईन बरोबर नाहीं. दोन नंबरवर आलेल्या सगळ्या तारा अडकल्या गेल्या आहेत, चला जलदी करा दुरुस्तीला माणसं बोलवा. समजलं ना ! '

' हो, हो, सर्व कांहीं समजलं, मी तारकामगार पाठवून देतों. ' असं म्हणून त्यानं रिसिव्हर खालीं ठेवला. आणि मळकी विजार नि मळकट शर्ट चढविला.

रात्रीचे दोन वाजून तीन मिनिटें झालीं होतीं, खिडक्यांचीं दारं एकावर एक आदळूं लागलीं आणि थंड बर्फाचा आंत शिरकाव होऊं लागला.

तारांची दुरुस्ती होऊं शकेल पण बर्फाचं वादळ थांबविण्याकरितां काय करणार !

आणि सगळ्या लाईनी कामांतून गेल्या आहेत तो आपले फाटके बूट घालीत पुटपुटला.

दाराच्या बाहेर पडतो तोंच दाराच्या झटक्यानं त्याचा कोट फाटला. तें तुफान वादळ होतं पण तो कसा तरी बर्फाचा मार तोंडावर खात खात रस्ता चालूं लागला. त्याचा मुख्य इलेक्ट्रिशियन एक मैलाच्या अंतरावर रहात होता. त्यानं शेवटीं त्याचं दार ठोठावलं.

' टोकिओ सेंटरची बातमी ही अशी आहे. ' पुष्कळशी दारावर खटखट केल्यानंतर तारखात्याचा इलेक्ट्रिशियन ज्याचा पगार पांचव्या वर्गात असून त्याला दरमहा आठ येन मिळत असत, तो बाहेर आला. तो बाहेर येतांच त्याची बायको पांघरूण बाजूला सारून त्याच्या बाजूला येऊन उभी राहिली. तिकडे त्यानं न पाहिल्यासारखं करून आपले हावभाव बदलले. त्यानं सारुकीला हुकूम सोडला, ' म्हणजे आतां तावडतोब दुरुस्ती – चला, त्वरा करा व सार्‍या कामगारांना बोलावणी पाठवा ! '

सारुकी आ वासून उभा राहिला. त्याच्या टूथ–ब्रशासारख्या दांतावर बर्फ पिठासारखा पडूं लागला.

आणि हें असंच आहे. तारखात्यांत टेलिफोन किंवा टेलिग्राफमध्यें कांहिंही चूक झाली कीं लोक एकसारखी कुरकुर करतात. अधिकारी खालच्या लोकांवर मोठ्यानं ओरडतात. मग वादळ असो कीं वावधान असो कामगारांना ते दुरुस्त करण्याकरितां घराबाहेर पडण्यास भाग पाडतात. समजा एखादी तारेची लाईन बंद पडली तर कामगारांचं त्यापासून काय नुकसान होतं ? पण ह्या तार-खात्यांत कामगारांना आपलं घर आणि गाढ झोंप मोडून बाहेर पडावं लागतं.

आणि जर त्यांनीं टाळाटाळ केली तर त्यांना एक दिवसाच्या मजूरीकरितां मुकावं लागतं.

तारांचं एक मोठं जाळं पसरून हे पांढरपेशे आणि उच्चवर्णीय लोक आपलं संधान साधीत आहेत. आणि ते त्यापासून आपला फायदा आणि धंदाच फक्त बघत नाहींत तर ते आपले कट रचीत आहेत. आपल्या शत्रूला निःपात करण्याचं तंत्र योजीत आहेत. आणि लढाऊ कामगारांच्या चळवळीवर संक्रांत आणीत आहेत.

प्रत्येक पोलीस खात्यांत, प्रत्येक राजकीय खात्यांत, प्रत्येक गुप्त खात्यांत टेलिफोनची पेटी तयार आहे.

एखादा पोलीस रस्त्यानं चालला आहे. तो आपले पालींसारखे डोळे कम्युनिस्ट पुढाऱ्यावर ठेवीत आहे. एखाद्या टॅक्सींत एखादा माणूस जात असतांना हा त्यावर नजर ठेवीत आहे. त्याच्या सर्व खाणाखुणा पडता-ळून तोच माणूस त्याला पाहिजे असल्यास त्याच्या मोटारीचा नंबर कळविण्या-करितां तो शेजारच्या फोनमधून पोलीस स्टेशनमध्यें खबर देत आहे. आणि मग एका स्टेशनावरून दुसऱ्या स्टेशनवर टेलिफोनची घंटा सारखी वाजत असते.

मग तीन मिनिटांच्या आंतच साऱ्या टोकिओ शहरांत एक जाळं पसरलं जातं. किती हुशार आहे पोलीस ! पण त्याहीपेक्षां जास्त सोयीस्कर आहे भांडवलदारांचं हें तारखातं !

सारुकी टामाओ त्या इलेक्ट्रिशियनकडून जो निघाला तो साऱ्या रात्रीं शहरांत भटकत आपल्या कामगार मित्रांचीं दारं ठोठाऊं लागला.

' चला लवकर हजेरी द्या, साऱ्या लाईनी बंद झाल्या आहेत.'

आणि इतक्या रात्रीं तो कामगारांना बाहेर काढीत होता. म्हणून ते आतां इतक्या वादळांत आपल्याला कामं करावीं लागणार म्हणून त्याला दोष देत होते. सारुकी म्हणत असे, ' मला दोष देण्यांत काय अर्थ आहे. ' तो आपल्याशींच पुटपुटत असे, ' हे सारे लोक माझ्यावर रोखून बघत आहेत. जसा कांहीं मी एक धोकेबाज माणूस आहे. ही अगदीं खडतर नोकरी आहे. दुसऱ्यांना तुच्छ लेखा, माझ्या मित्रांनों! माझा द्वेष करूं नका. माझी चूक नाहीं. तो अधीर झाला, विचित्र चेहरा करून घरन् घर चालूं लागला.

एका तासाच्या आंत १८ तार कामगार साऱ्या तयारीनं पोष्ट ऑफिसपाशीं जमा झाले.

' तुम्ही सर्वजण आलांत आतां आपण कामास लागूया. तो तरुण इलेक्ट्रिशियन म्हणाला.

मिरुमी आणि दामागिवा या दोघां कामगारांना त्यानं टेस्टपोलवर पाठविलं व सकाळपर्यंत त्यांना तेथेंच थांबण्यास बजाविलं.

ते दोघे तिकडे गेल्यानंतर टेलीफोनची घंटा वाजली इलेक्ट्रिशियननी रिसिव्हर आपल्या कानाशीं लावला.

' टोकिओ ३ नंबरची तार आणि योकोहामा १२ नंबरची तार चालू आहे. पण अगदीं वरची तार नंबर २ आणि तार नं. १ ह्या तारा बिघडल्या आहेत. मला वाटतं आतां सर्व नीट जुळलं असेलच. ' तो बाहेर आला, तेथं बाकीचे कामगार बसले होते त्यांना त्यानं बाहेरच्या लाईनी टेहळणीकरितां पिटाळलं. तो स्वत: ' टेस्टपोल ' जवळ आला. सबंध लाईन नीट होईपर्यंत

त्याला तेथं थांबणं भाग होतें. कांहींहि असो. तो चार भिंतीच्या आंत थांबला होता. तेथं वादळ त्रास देत नव्हतं. पोष्ट ऑफिसांतली शेगडी त्याचा थंडीपासून बचाव करीत होतीं.

सारुकी दोन कामगारांची एक एक टोळी घेऊन टोकियोच्या सहा नंबरच्या तारेवर काम करण्यास निघून गेल्यावर रस्त्यांत विरुद्ध बाजूंच्या तारांपैकीं एक तार बिघडली असल्याचं त्याला कळलं.

त्यानं एक गॅस–लॅंप लावला. तो टेलिफोनच्या खांबाच्या ओळीवरून उत्तरेकडे चालूं लागला. पंचवीस मैलांच्या अंतरावर दुसरं एक पोष्ट–ऑफिस होतं. आणि इकडूनहि कांहीं लोक पाठविण्यांत आले होते. अशा रितीनें अर्धं अर्धं अंतर विभागण्यांत आलं होतं.

रात्रीचे साडेतीन वाजले होते. ' थंडी कोण आहे ' याचा सारखा ते उच्चार करीत होते. त्यांच्याजवळ ओव्हर–कोट नव्हते.

आतांपर्यंत ते पंधरा मैलांचं अंतर बघत बघत आले होते.

एक उंच शिडीची गाडी, एक उंच बांबू, हत्यारांची पेटी व तांब्याच्या तारेचा एक गुंडाळा एवढं सामान ते बाळगित होते.

अशा वादळांत तारांना पुष्कळ धोका पोंचत असे. तारा एकावर एक अडकत असत, कांहीं तुटून खालीं पडत किंवा बर्फ तारांवर जमूं लागत आणि अशा रितीनं बातम्या जाण्यास आडकाठी उत्पन्न होत असे.

सारुकी आणि त्याच्या बरोबरचीं दोन माणसं सारखीं चालत होतीं.

इतक्यांत ते एका बंद हॉटेलच्या दारापाशीं आले. आतां ते चालून कंटाळून गेले होते.

अजून त्यांना कितीतरी लांब जावयाचं होतं, या तारांना अंत नाहीं त्या स्वर्गापर्यन्त पोंहोंचल्या आहेत. आणि त्यांनाहि जीवनाशीं झगडत झगडत तेथपर्यन्त गेलंच पाहिजे.

त्यांनीं त्या लहानश्या हॉटेलच्या दारावर थाप दिली. एका मुलीनं उठून तसंच दार उघडलं, तिच्या चेहऱ्यावरची पॉवडर घामानं भरली होती आणि

अंगावरचे कपडे अस्ताव्यस्थ झाले होते. ती आपल्या धंद्याप्रमाणें विचित्र हावभाव करीत होती.

'ए, मुली, रात्रीचं कांहीं जेवण उरलं आहे काय?' ती मुलगी त्या लोकांना पाहतांच लाजली. चेहऱ्यावरचे हावभाव बदलीत म्हणाली, 'अं, हं, कांहींच शिल्लक नाहीं.'

ते सारे तेथून निघाले, बरोबर कांहींहि सामान घेण्याचा त्यांना कंटाळा आला होता. पण दुसरा उपाय नव्हता.

'आतां पुन्हां आपल्या त्रासांना सुरवात झाली आहे. नाहींतर......'

'...नाहींतर याच हॉटेलांत या मुलीबरोबर मजा केली असती.'

'हो पण आम्ही सर्वच तुझे शत्रू झालो असतों. म्हणजे तुला काय वाटतं आपण परत फिरावं?'

'इतकं कुठं आहे आपलं भाग्य.' असें म्हणत ते सर्व हंसले.

सारूकी म्हणाला, 'असं म्हणण्यांत कांहीं अर्थ नाहीं, आपण गरीब आहोंत, त्या हॉटेलांत मजा करायची मनांत आणली तर पैसे कुठं आहेत? बरं पण जाऊं द्या. हा विषय बंद केलेलाच बरा.'

'अशा कष्टमय जीवनापेक्षां मरण पत्करलं. कोण अशी नोकरी आयुष्यांत करील.' कोणीतरी एक हुषार कामगार म्हणाला. त्याचं नांव माशिदा होतं, त्याचा चेहरा पिवळा असून दाढी वाढली होती. कामचुकारपणांत त्याचा नंबर पहिला होता.

'तुला ही नोकरी आवडत नाहीं?' सारुकीनं विचारलं,

'आहे काय आवडण्यासारखं या नोकरींत?'

'पण तूं तर या धंद्याचं किती कष्टानं शिक्षण घेतलं आहेस?

'तुला असं वाटलं काय कीं, मी जें शिक्षण घेतलं तें तुझ्याइतकी पगारवाढ मिळत जावी म्हणून.'

'कांहीं तरीच बडबडूं नकोस.' सारूकी म्हणाला, तसं म्हटलं तर माशिदा अशाच वाहत्या वाऱ्यांत लाईन्समनच्या हाताखालीं उमेदवारी करूं लागला,

मग त्यानं परिक्षा देऊन एका उच्च लाईनमनची पदवी घेतली पण त्याला हा धंदा आवडत नव्हता. नोकरी करून सारा वेळ त्यांत घालून कमी पगार मिळविण्यापेक्षां स्वतंत्रपणें हा धंदा करून तितकीच मजूरी मिळवावी आणि पुन्हां फावल्या वेळांत कांहीं महत्तम कार्य करावं अशी त्याची मनिशा होती. पण सारुकीची स्थिति तशी नव्हती, तो पगारानें एकसारखा वर चढत होता म्हणून त्याला नोकरी बरी वाटत होती.

आतां सूर्य तळपूं लागला होता. बर्फानं आच्छादिलेले रस्ते वितळूं लागले होते. थोडेंसं दूर चालल्यानंतर समोरच्या खांबावर कांहीं तारकामगार काम करीत असलेले त्यांना दिसले. ते बहुतेक त्या पंचवीस मैल लांबीच्या स्टेशनवरून बऱ्याच वेळानं दक्षिणेकडचं अंतर काटीत निघाले असावेत.

सारुकी आणि त्याच्या बरोबरीच्या कामगारांना हांक देत ते म्हणाले, 'या लौकर या, येथील काम आम्हांला अजून जमत नाहीं.'

'हा तरुण मुलगा स्वतःच काम करीत आहे. दुसऱ्याला जवळ फिरकूं देत नाहीं. तारा अजून दुरुस्त होत नाहींत अन् दिवस तर उगवला आहे.'

सारुकी आणि त्याची माणसं त्या कामगारांच्या खांबाजवळ येऊन उभी राहिली. 'हा बघा हाच तो वेडा मुलगा ऐकतच नाहीं आमचं नि त्रास देत आहे आम्हांला.'

ते सारे उभे राहिले. असमाधानानं पाहूं लागले. आतां आणखिन काम करण्याची नि तारा जोडण्याची कठीण वेळ आली होती कारण सबंध खांब बर्फानं माखलेला होता अन् बर्फ वितळण्याचं चिन्ह दिसत नव्हतं. ते उपाशी पोटीं होते व अगदीं थकून गेले होते. पण तरीहि, 'चला अच्छा कामास लागू या.' असं म्हणत कोणत्यातरी आवेशानं सारुकीनं कामास सुरवात केली.

त्याचं काम जोरांत चालू असतांनाच माशिदा सारूकीवर नजर टाकीत म्हणाला, 'तुला पगार किती मिळतो.'

'काय मला? ४ येन दर दिवसाला'

'आणि थोडासा प्रवासाचा खर्चेही कांहीं?'

'हो तर सर्व मिळून दिवसाला सरासरी ३० येन पडतात. अशा कठीण दिवसांत इतकं मिळतं हें काय कमी आहे.'

'आणि यांतच तूं भागवून घेत आहेस.' असं म्हणून सारुकी हंसला.

त्याचं हंसणं थांबवित इशादा म्हणाला, 'पण तुला येवढं समजत नाहीं कीं, जेव्हां तें तुला दौऱ्यावर पाठवितात तेव्हां तुला २०-३० येन तरी निराळे मिळाले पाहिजे. मला तर असं दिसतं कीं, कांहीं काम न करणाऱ्या इंजिनियरांनांसुद्धां दौऱ्याचा १० ते २० येनपर्यंत भत्ता मिळतो. या गोष्टीबद्दल विचार करूं लागलों कीं या स्वार्थी जगाबद्दल मला निराशा वाटते.'

यावर सारूकी खोल आवाजांत पण गंभीरपणें म्हणूं लागला, 'हो, तूं म्हणतोस तें सारं खरं आहे. आपण सारे जण वाईट रितीनं वागविले जात आहोत. आणि खरोखर आम्हांला कांहीं तरी उपाय केला पाहिजे. कांहीं लोक आपल्या कामगारांची एखादी युनियन स्थापण्याची भाषाही बोलत आहेत. पण मला वाटतं बराचसा विचार करूनच या गोष्टीला संमति दिली पाहिजे. आपण अशा जहाल गोष्टींशी संधान बांधूं लागलों म्हणजे आपल्याला फारच जास्त जाच सहन करावा लागेल. आणि नोकरी सुटली तर दुसरी नोकरी कशी मिळेल? या टोकियो शहरांत तर एक जागा खालीं असली कीं बेकारांची ही धूम असते तिथं.'

'बरं मग आपण जर असं केलं नाहीं. तर मग आपणाला न्याय, मागण्या आणि हक्क मिळणार तरी कसे.'

'इतकं करूनही आपणांला मिळणार तरी काय दोन किंवा तीन येनची वाढ किंवा क्वचित प्रसंगीं एका वर्षाला चार येन जास्त.' असं बोलतांना सारुकीला मध्येंच कांहींतरी आठवण झाली व तो पुढं बोलूं लागला,

'त्या दिवशीं कोणीतरी भला माणूस संस्कृतीसंघांत लाईन्समनविषयीं बोलूं लागला होता. आणि आगामी संस्कृतीसंघाच्या परिषदेंत तारकामगारांविषयीं एक ठरावही पास करून घेणार आहेत म्हणे. ते म्हणतात कीं राष्ट्रीय जबाबदारीच्या दृष्टीनं यांना एक मोठं स्थान आहे. आणि तो माणूस असेच मोठे मोठे शब्द वापरीत होता'

'कुठंहि काय प्रशंसा स्वस्त असते,' मशिदा म्हणाला, 'हा तर त्यांचा नित्याचा खेळ आहे. जेव्हां इलेक्ट्रिशियन दौऱ्यावर जातो त्याला खास भत्ता मिळतो. जितक्या लांबीचा प्रवास असतो तितकीच लांब रक्कम मिळते. एका एका मैलाला कितीतरी येन अन् आमच्यासाठीं! मग आम्ही वीस मैल प्रवास करो अगर चाळीस मैल आम्हाला एक कवडीसुद्धां जास्त मिळत नाहीं. जर आम्ही तारकामगार राष्ट्रीय जबाबदारीच्या दृष्टीनं मोठे आहोंत तर मग कां फक्त एक वर्षानंतर आमच्या पगारांत एक येन एक दिवसाला वाढ होते? आणि कां आम्हांला प्रवासाच्या लांबीचा भत्ता मिळत नाहीं?'

त्यांना शेजारच्या विटांच्या भिंतीवर दोन निजलेल्या माणसांचं घोरणं ऐकूं आलं. 'अरे मित्रानों उठा आतां.' असं म्हणत सारूकी उठला आणि त्या दोन निजलेल्या माणसांना उठविण्याची हांक देत त्यानं इशादाचं अप्रीय संभाषण तोडलं.

त्याच्या घडयाळांत साडे अकरा वाजले होते. ते आठ तास एकसारखे चालत आले होते. आणि आतां पुन्हां घरीं जाताना त्यांना तितकंच चालावं लागणार होतं.

त्याचं काम आटोपलं. 'चला आपण निघूं या.' ते सर्वजण म्हणाले. चलायचं कुठं आणि किती लांब?

जीवन आहे तो पर्यन्त!

टपाल आणि तारखात्याच्या संस्कृतीसंघांनीं टोकियोंत शिबा भागांतल्या एका मंदिरांत परिषद भरविली. पन्नास लाईन्समन्, तीस हुषार कामगार, वीस इलेक्ट्रिशियन्स, इंजिनिअर्स आणि फोरमन्स सारे तेथं एकत्र जमले होते. तारकामगार टोकिमोटोहि त्यांत दाखल झाला होता.

ही परिषद तीन दिवस भरली होती. या दिवसांत सारे सभासद रात्रीं तेथंच झोंपत असत. दिवसभर ते कांहीं तरी काम करीत असत आणि संध्याकाळीं भाषणें ऐकत असत.

' ही अशी यांची संस्कृति ! ' ती त्यांना तेथें जमलेल्या सरकारी नोकरांकडून अनुभवायला मिळत होती.

भाषणांत असे मुद्दे निघत असत कीं, 'लढाईच्या दिवसांत लाईन्समनची जबाबदारी फारच मोठी आहे. युद्धाच्या दिवसांत प्रत्येक तऱ्हेचे टेलिग्राम्स् टेलिफोन साऱ्या तारांवरून घटकेघटकेला वाहात असतात.

' बातमी मिळाल्यावरच फौज योग्य ठिकाणीं पाठविली जाते. पुढचा आराखडा करण्यांत येतो. हुकूम पाळले जातात आणि राष्ट्राचं सारं भवितव्य या हुकूमबाजीवरच अवलंबून आहे. आतां तुम्हांला समजलं असेल कीं तुम्ही इतके कष्ट आणि श्रम करतां. कारण तुम्ही टेलिफोन आणि टेलिग्रामचे डॉक्टर्स आहांत. म्हणून सांगतों कीं अतिशय कष्टानं आणि फारच उत्साहानं राष्ट्राची एकजूट होण्यासाठीं तुम्ही विश्वासानं काम करा. आणि एकदां तुमची ही राष्ट्रीयवृत्ती तुम्हांस कळली कीं मग तुम्ही परप्रांतीय, नवीन मतांच्या नि जहाल विचारसरणींच्या वाबटळींत सांपडणार नाहींत. त्यांच्या कोणत्याहि कार्यावर विश्वास ठेवणार नाहीं. '

दुसऱ्या दिवशींच्या भाषणांत असं सूचित केलं कीं, ' युद्ध येत आहे. अशा आणिबाणीच्या वेळेस कामगारांनीं आशाधारक बनलं पाहिजे. ' जवळ येणाऱ्या युद्धाला जर आपण निराशेनं तोंड दिलं तर आपला विनाश आहे. कामगारांनीं आपल्या हाडांची काडं करून युद्धाला तोंड दिलं पाहिजे. मागच्या युद्धाच्या वेळेससुद्धां आपल्या खात्यांतल्या साऱ्या कामगारांनीं

संकटांस तोंड दिलं. त्यांनी या तारांच्या जाळ्यांवर अशी मालकी गाजविली कीं शत्रू भीतीनं पळून गेले.

शेवटच्या रात्रीच्या कार्यक्रमाला सुरवात झाली. एक भाषण ठरलं होतं. अध्यक्षानं व्याख्यात्याची ओळख करून दिली.

'आजचे वक्ते तुमच्यासारखेच एक कामगार आहेत. या वेळेस ते तुमच्या पुढं एक मोठा गहन प्रश्न आणून ठेवणार आहेत. मला मुळींच शंका वाटत नाहीं कीं ते जे कामगारांचं हित पाहात आहेत त्यांत आपला सर्वांचा फायदा आहे. मला आशा आहे कीं तुम्ही त्यांचं म्हणणं एकाग्रतेनं ऐकाल !'

टाळ्यांच्या गजरांत वक्ता उभा राहिला. रोडकेलेसा आणि ऊग्र चेहऱ्याचा गृहस्थ परप्रांतीय रेडिमेड कपड्यांत उभा राहिला.

टोकिमोटोला वाटलं कीं तो बुद्धिवान असावा. 'अध्यक्ष महाराज आणि सभ्य गृहस्थहो,' कसलेल्या वक्त्यासारखा आणि थोड्याशा बेदरकारपणें तो बोलूं लागला, 'कांहींहि न लाजता आणि थोडासाहि विचार न करतां मला तुम्हाला सांगावंसं वाटतं कीं गेल्या वर्षापर्यन्त मी जपानी कम्युनिस्ट-पार्टीचा एक चलाख कार्यकर्ता होतों.'

सारा श्रोतृगण जो त्याच्याकडे एक एक शब्दाच्या अविर्भावावर नजरा रोखीत होता. ते सर्व जपानी 'कम्युनिस्ट पार्टी' हा शब्द ऐकतांच, सारे सरकारी लाळघोटे एकदम धक्का बसल्यासारखं चमकले. रागानं बघूं लागले. याचं कांहींहि न ऐकण्याच्या लायकीचा हा वक्ता आहे हा तर—पण यानं 'लाजून' या शब्दानं आपली शालीनता कां दाखविली आणि नको असलेल्या त्या पार्टीचा सभासद किंवा कार्यकर्ता हें सांगण्याची गरज काय?

सर्वांनीं याच अर्थानें सरकारी इंजिनिअर्सकडे नजरा वळविल्या. पण कांहींहि आश्चर्यचकित न होतां सर्वांनीं आपल्या नजरा पुन्हा वक्त्यावर नेल्या.

टोकिमोटोला वाटलं कीं ह्याचा आवाज दबका कां? आणि 'कम्युनिस्ट पार्टी' असं कां म्हणतो? 'कामगार वर्ग' असा शब्द हा कां वापरीत नाहीं. आतां व्याख्याता आपला दबका आवाज थोडा थोडा उंचावूं लागला.

'पण, कामगार वर्गाचें ते मान्यवत पुढारी, जेव्हां आम्ही इकडे तिकडे शौर्यानं लढत होतों?' तेव्हां तिकडे लाल प्रकाशांत ते जुव्वाबाजी आणि वेश्यांच्या फंदांत पडून रशियांतून आलेल्या पैशाची वासलात लावीत होते. ......'

त्याचा आवाज पूर्णपणें तिरस्काराचा होता.

आतां मात्र टोकिमोटोच्या मनांत लखकन् प्रकाश पडला. याचं येथील भाषण हा देखावा असावा. हा वक्ता सरकारचा पूर्णपणें मिंधा आहे. पण पुन्हां तो बोलतो तरी काय म्हणून टोकिमोटोनं त्याच्या भाषणावर भान रोखलं.

'म्हणून याकरितां मला कॅम्युनिझमबद्दल निराशा वाटत आहे. त्यांचीं तत्वें आणि प्रमेयें गंभीर आहेत. पण त्याकरितां काम करणारे पुढारी आणि त्यांना अंमलांत आणणारे लोक अगदीं भ्रष्ट होतात. बंधूनों, मी माझी चूक कबूल करतों. मला त्याबद्दल पूर्ण पश्चात्ताप होतो. जर तुम्ही माझ्या मनाप्रमाणं वागलात तर तुम्हालाहि पुढाऱ्यांकडून वाईट रितीनं वागविण्यांत येईल. आणि मी आतां तुम्हाला एक प्रयोग करून दाखविणार आहे कीं मी झाल्या गोष्टीचा किती पश्चात्ताप करीत आहे.

'मी धोकेबाज नाहीं. मी शपथ घेऊन सांगतों कीं मी आपल्या पूज्य सरकारचा एक बंदा सेवक आहे. येथं त्याचा एक पुरावा हजर करीत आहे!'

असं म्हणत त्या वक्त्यानं खिशांतून कांहींतरी बाहेर काढलं. एक चाकू. मग त्यानं आपला डावा तळवा टेबलावर ठेवला. त्यानं चाकूचं पातं हवेंत फिरवलं. तें तळव्यावर जरा वरच्या बाजूला आणलं. कांहींसा थांबला. इंनिनिअर्स बसलेल्या जागीं त्यानं नजर टाकली. जसं कांहीं त्याच्या कृत्याला साक्षीदार म्हणूनच तेथं त्याचे मित्र बसले होते. व्याख्यात्यानं टेबलावर बोटें पसरलीं आणि हळूच त्यानं करंगळीवर चाकू ठेवला, जोरानं दाबला. आह! जोरानं ओरडला. रक्त निघूं लागलं. सारे श्रोते एकदमच जागेवरून उठले.

रक्तानं माखलेली करंगळी टेबलावर लोळूं लागली आणि वक्त्याला घेरी येऊन तो बेशुद्ध स्थितींत टेबलाजवळ पडला.

टोकिमोटो उठला, आणि त्यानं आपला मार्ग काढला. चार-पांच दिवस आधीं त्या टेस्ट-पोलवर 'करंगळी आणि भाषण' याचा असंबद्ध संवाद त्यानं रिसिव्हर मधून ऐकला होता. त्याचं अगदीं तंतोतंत प्रत्यंतर त्याच्या डोळयांपुढं घडलेलं त्यानं पाहिलं.

तो आश्चर्यानं कापूं लागला. आणि या वास्तववादी चमत्कृतीनं गांगरून गेला.

पुन्हां जपानी सरकारनं कामगारांना जाळयांत ओढण्याकरितां स्थापना केलेल्या संस्कृतीसंघांत परत न येण्याचा विचार करून तो बाहेर पडला. आणि तो पुटपुटूं लागला, तारांचं जाळं आणि या सरकारी लाळ घोट्यांनीं मांडलेलं संधान!'

'वारे वा : यांची संस्कृति!'

# गिदाली ⁘ ◆ ◆ ◆ ३.

एका शुक्रवारीं माझं मन गतस्मृतींच्या जड निराशेनं भरुन आलं होतं. एका काळीं माझे वृद्ध आजोबा आपली पिवळी दाढी छातीशीं लावीत ब्रेन इस्राईलचीं जाडीं पुस्तकें वाचून अशा संध्याकाळीं ढकलत असत. आणि माझी आजी रात्रीं मिणमिणणाऱ्या दिव्यांत आपलीं कामं उरकित असे. अशा वेळेस माझं बालिश मन संथ सागरावर वाहणाऱ्या बोटीप्रमाणं प्रमुदीत होत असे.

आह ! त्या बालपणांतील पुसट स्मृति ! अन् किती काळ्याकुट्ट आहेत त्या आठवणी !

आकाशांत तारे दिसूं लागतांच मी झिटोमिर शहरांत भटकलों. त्या पुराणप्रिय माणसाच्या कधींहि चूना न लावलेल्या काळ्या भिंती. म्हातारे ज्यू खड्डू विकीत, कपडे धूत आणि दिवे विकीत असत.

मला ज्यू लोकांच्या दाढ्या एखाद्या देवदूताप्रमाणं भासत आणि परिस्थितीची जाचक कल्पना त्यांचे खोल गेलेले गाल दाखवित असत

बघा, माझ्या समोर एक बाजार आहे. त्याच बाजारांत आतां भयाणता पसरली आहे. तसलीं सारीं जुनी माणसं आतां मेलीं आहेत. गोटा केलेल्या

माणसांच्या डोकीप्रमाणं रस्ते दिसत आहेत. वर कांहीं अंधुक तारे चमकत आहेत अन् त्यांतून कांहीं गळून पडत आहेत.

भटकून भटकून मला बऱ्याच वेळानं यश मिळालं. 'तें सूर्य मावळतांच मिळालं. गिदालीचं सेकंडहँड सामानाचं दुकानहि अशाच बंद पडलेल्या बराकींत होतं. त्यांतहि उत्सुकतेनं पाहिल्यास तुम्हाला जुने बूट, मेंढ्यांची चामडी, एक लहानसं होकायंत्र, वाळून गेलेली घार, १४१० चं विन्चेस्टर रायफल आणि एकदोन ताटं तुम्हाला दिसलीं असतीं.

गरीब गिदाली, गुलाबी संध्या पसरेपर्यन्त भांडयांत पैसे जमा करीत असे. काळ्या कांचेचा चष्मा लावलेला आणि खांद्यापासून पायापर्यन्त लांब सदरा घातलेला तोच दुकानचा मालक होता. तो आपले गौरथिटे हात एकावर एक घाशीत असे. आपल्या लहानशा हिरव्या दाढीवर हात फिरवीत असे आणि एकीकडे लक्ष देऊन तो न दिसून येणारा धक्काधक्कीचा आवाज ऐकत असे.

त्याचीं हीं लहान दुकान नेहमीं नेहमीं प्रश्न विचारून गंभीर बनणाऱ्या मुलाप्रमाणें होतीं. जशी कांहीं ती एक जीवशास्त्राचा प्राध्यापकच बनणार होतीं. तिथं झाडाची कुंडी आहेत, मेलेलीं फुलपाखरं आहेत. आणि त्या दुकानावर मालकाचं नांव आहे गिदाली.

आतां सर्वांनीं ती बाजारची जागा सोडून दिली आहे. आजूबाजूला डोकीच्या कवट्या दिसत आहेत, निरनिराळ्या रंगाचीं पिसं वाऱ्यांत उडत आहेत. सारं कांहीं मरून गेलं आहे. पण गिदालीची स्मृति माझ्या मनांत ताजी आहे. त्या धरणीवर अजूनहि तो आपल्या दुकानांतल्या जाळीकामाचीं तोंड फाडून स्तुति करीत असलेला मला दिसत आहे.

आणि तशाच स्थितींत आम्ही एका रिकाम्या दारूच्या पिपांवर बसलों. गिदालीनं दाढींतून इकडे तिकडे हात फिरविला. त्याची टोपी आमच्या पायां लगत पडली होती. पांढऱ्या शुभ्र चांदण्यांत तीं काळ्या खुणेसारखी दिसत होतीं. भोंवतीं गरम वारा वाहात होता. आकाश आपले रंग बदलत होतें:

आमच्या वरच्या बाजूला सामुदायिक शांततेकरितां उच्च मतप्रणालीवरून रक्ताचे पाट वाहिले जात होते. आणि सडकी घाण एकसारखी सुटली होती.

'क्रांति' त्याबद्दल मला बोलूं दे. ती होईलच. आणि खरंच, शुक्रवारच्या आमच्या वादविवादांत ती होणार नाहीं असं आम्ही मुळींच म्हणत नसूं. गिदाली अशा रितीनं सुरवात करीत असे आणि आपल्या रेशमासारख्या मऊ भुवयांतून माझ्यावर दबकी नजर टाकीत असे.

क्रान्तीचं नांव येतांच ती आलीच पाहिजे, ती झालीच पाहिजे असं मी जोरानं ओरडत असे.

पण क्रान्ति गिदालीपासून नेहमींच लपत असे. अन् ती त्याला न दिसतांच गोळीबाराचा एकसारखा आवाज काढीत असे.

' बंद केलेल्या डोळ्यांना सूर्य दिसत नाहीं पण सूर्याच्या प्रखरतेपुढें आपल्याला डोळे बंद करावेच लागतात. ' मी उत्तरलों.

गिदाली माझ्या कानांत सांगूं लागला, ' पोलीश लोकांनीं माझे डोळे बंद केले आहेत. ही वेडी कुत्रीं ज्यू लोकांना त्रास देत आहेत, दाढया उपटीत आहेत आणि आतां त्यांचा बदला ! आतां तींच पिसाळलेलीं कुत्रीं मार खात आहेत.

' हें छान आहे. आणि हीच ती क्रान्ति ! आणि जे पोलीश लोकांना मारीत आहेत त्यांपैकीं एक क्रान्तीकारक मला येऊन भेटला नि म्हणाला, ' गिदाली तुझा ग्रामोफोन मला रजिस्टर करूं दे......' माझ्या पाठीवर हात फिरवित गिदाली म्हणाला, ' पेन ' मला संगीताची किती आवड आहे ! मी त्या क्रान्तीकाराला तसं सांगितलं पण तो उलट म्हणाला कीं, मला माहित नाहीं कां तूं कशावर प्रेम करतोस ? गिदाली मी तुझ्यावर गोळी झाडली म्हणजे तें तुला कळेल. गोळी झाडणं माझं काम आहे, कारण मीच ती क्रांति......'

' पेन्, तूंच सांग तो पोलीश लोकांना मारीत होता, कारण तो क्रान्तीकारक होता. तूं कोणाला गोळी घालशील तें तूं क्रान्तीकारक आहेस म्हणून ? पण क्रांति कां ? ' ती कांहींशी आनंददायक वस्तू आहे. लहान मुलांना आनंद झाला म्हणजे तीं घरीं ठरत नाहींत. चांगलीं कार्यें चांगलींच माणसं करूं

शकतात पण चांगलीं माणसं दुसऱ्यांचं चांगलं करूं शकत नाहीं. याचा अर्थ असा कीं क्रांतिकार्य करणं हें वाईट लोकांचं काम आहे. पोलीशलोक सुद्धां अति वाईट आहेत मग असं ह्या गिदालीला कोण सांगूं शकेल कीं क्रांति कुठं आहे ? आणि तिचे विरोधक कोण आहेत ? मी आपल्या निरनिराळ्या प्रदेशांत भाषा शिकलों आहे, अभ्यास केला आहे. आणि लक्षांत ठेव आम्ही सर्व विद्वान आहोंत. आम्ही विनम्र भावानं तुम्हाला विचारतों कीं तिथं न्या कीं जिथं क्रान्तीचं गोड स्वरूप असेल तिथं !'

तो वृद्ध माणूस आतां शांत झाला. वरच्या पांढऱ्याफेक आकाशांत पहांटच्या तारा चमकूं लागला.

गिदाली गंभीरपणानं पुढें बोलूं लागला, 'पेन्, काम्रेड, माझ्याप्रमाणं जर करशील तूं तर तुला सारे ज्यू धन्यवाद देतील !' आणि जागेवरून उठत तो म्हणाला, 'पेन्, झिटोमिर शहरांत चांगल्या लोकांना आण. तसलीं माणसं आपल्या शहरांत नाहींत. चांगलीं माणसं आण म्हणजे मग आपण त्यांना सारी ग्रामोफोन्स देऊन टाकूं. आम्ही अजाण माणसं नाहींत. तिसरी आंतरराष्ट्रीय......आम्हाला माहित आहे काय आंतरराष्ट्रीयता असते ती. आणि म्हणून मला चांगल्या लोकांची आंतरराष्ट्रीयता हवी आहे. मला वाटतं प्रत्येक मनुष्याची नोंदणी झाली पाहिजे. प्रत्येकाला पोटभर अन्न मिळालं पाहिजे. आणि असं झालं म्हणजेच लोक खातील, पितील, मजा मारतील.

'पेन, कॉम्रेड, तुला माहित नाहीं, इन्टरनॅशनलनें कशी सेवा करावी ती......'

मी एकदम चमकून म्हणालों, 'तिनं बंदुकीनं सेवा करावी अन् हंगामी रक्ताचे पाट वाहावेत, तसं झालं तरच......'

गर्द निळ्या रंगाचं सिंव्हासन घेऊन शुक्रवारचा दिवस उगवला.

मी म्हणालों, 'गिदाली आज शुक्रवारचा दिवस उगवला आहे. ज्यू लोकांचें पेय ज्यूईरा मला मिळेल काय ? आणि ज्यूईरा पेयाच्या कपाबरोबर तुमच्या ज्यू लोकांच्या कल्पनेप्रमाणें त्या लहान लहान देवता माझं स्वागत करतील कां ?

‘ तें कुठं मिळणार नाहीं. ’ खालीं आडवा पडलेल्या एका रिकाम्या पिपावर पाय आदळीत तो म्हणाला, ‘ कुठंच मिळणार नाहीं येथं जवळ हॉटेल आहे. आणि चांगल्या माणसांनीं तें चालविलं आहे पण आता तिथं कोणीच जेवत नाहीं. ते सारे रडतात. ’

त्यानं आपल्या लांब सदऱ्याचीं बटणं लावलीं.

लहानशा ब्रशानं त्यानं आपल्या अंगाला राख फासली. आपले थिटे हात धुवून काढले. काळी टोपी डोक्यावर ठेवली. प्रार्थनेचं पुस्तक बगलेंत मारलं आणि प्रार्थना करण्याकरितां त्या चर्चच्या स्वप्नाळू जगांत तो निघून गेला.

शुक्रवार येत आहे. इन्टरनॅशनलवर विचित्र कल्पना उभारणारा गिदाली चर्चमध्यें प्रार्थनेला गेला आहे.



# मानवी वारे ⁘ • • • ४

मानवी जीवनांतील दहा वर्षें :—ते दिवस वाईट जरी गेले असले तरी पण सिंहावलोकन केलंच पाहिजे. त्या दिवसांत घडलेल्या घटना म्हणजे जणूं काय कालच घडलेल्या गोष्टी इतक्या ताज्या. एखाद्या माणसाला आपल्या गत स्मृतीचा आढावा घेण्याची खोडच असते. कपाळावर आठ्या आणून आपल्या खोलींतल्या वस्तूंवर नजर चाळवून त्याच्या त्या दिवसांतल्या साऱ्या स्मृति जागृत होतात. पण प्रत्येक दहा वर्षांत त्याच्या जीवनांत आलेल्या व्यक्ति सनातनी न्यायाप्रमाणें लाखों जीव घेण्याकरितां निघून गेलेल्या असतात. आणि पुन्हां त्याच दहा वर्षांत त्याचसारखे दुसरे कितीतरी लाखो मानवी जीव उत्पन्न होतात. जीवन आणि मरण..... !

ते जन्मतात, वाढतात, जगतात, दूरदेशीं प्रवास करतात आणि दुसऱ्या जीवनांना उत्पन्न करतात. आपल्या आयुष्यांत वसंत फुलवितात. सूर्याचे प्रखरतेंत आरामाचे मार्ग शोधतात. पावसाचे कधींहि लौकर न संपणारे दिवस ते दुःखीत मनानं काढतात आणि हिवाळ्यांत गुलाबी संध्याकाळच्या वेळा त्यांना कमी कमी भासतात. हाच प्रत्येक मानवाचा मार्ग आहे. प्रत्येक खोलींत असा

हा मानवी जीवनाचा सुखद सुवास पसरलेला आहे. प्रत्येक मानवांत, प्रत्येक कुटुंबांत, प्रत्येक पिढींत त्याच त्या जीवनाकरितां एक सुखद वातावरण ते निर्माण करतातच. कधीं त्या जीवनाला कीड लागते. खरोखर सांगायचं म्हणजे ती कीड एकीकडून दुसरीकडे आगांतुकीनं येते. आणि ही जेव्हां सारी घटना डोळयांपुढं उभी राहते त्या वेळेस शहरांत व देशांत घडणारे प्रसंग माणूस विसरून जातो.

डोळयाखालील काळ्या वलयानं आणि खोलींतल्या बारीक वस्तूंवरून एकंदर वातावरणावरून त्या जबरदस्त घटनाकालाचीं स्मृति जास्त जास्त उंचावत जाते.

प्रत्येक देशात हे मानवी जीवनाचं वारे वाहात असतात.

ज्याची प्रामुख्यानं गोष्ट·सुरु होणार आहे हा मानव, इव्हान-इव्हानोविच अिव्हानोव त्याचं आयुष्य म्हणजे लाकडाची फरसबंदी केलेला एक उंच मनोरा. तिथं पोंहोंचावयाच्या रस्त्याच्या बाजूला कांटेरी तारांचीं केलेलीं कुंपणं. लहान लहान दारांतून बगिच्यांत यायच्या वाटा आणि रस्त्याच्या बाजूला मानवी आयुष्याला सुखद करणारीं फुलझाडं आहेत. त्याच्या घराच्या दबक्या खिडक्या बाहेर अंगणांतील हिरवळ बघत आहेत. पण त्याच्या आयुष्यांत मात्र जोराचं वारं वाहात आहे. त्यांत मानवी श्वासोच्छवास मिसळलेला आहे. चामड्याचं तुटलेले कोच त्याच्या खोलींत दिसत आहेत.

कोचांच्या पाठीमागें कितीतरी वर्षापासून जमविलेल्या सिगरेटच्या थोटुकांची रास दिसत आहे. त्याच्या खोलींतील पुस्तकंहि क्वचितच बदललेलीं आहेत आणि टेबल क्लॉथ नेहमीचा एकच आहे. लिहिण्याचं टेबल तेच आहे. सिगरेटच्या पसरलेल्या राखेंत विटलेल्या कपड्यासारखा पिवळा नि हिरवा रंग बदलत आहे. राख जमिनीवर अशी घट्ट बसली आहे कीं तीं झाडून काढणं अशक्यच आहे. त्या बसक्या खिडकीच्या पाठीमागें बगिच्यांत गवत खूप उगवलं आहे. कचरा कांटे आणि लहानलहान फळं पसरलीं आहेत. त्याच्या आयुष्यावर वारं वाहात आहेत. त्यांत मानवी श्वास मिसळलेला आहे. आणि तेंच वारं त्याच्या खोलींतहि त्याला हैराण करीत आहे.

त्याला त्या दुःखद स्थितींतून त्या पावसाळ्या दिवसांची आठवण येत आहे. काळोख भरलेल्या त्या हंगामांतल्या उजाड संध्याकाळीं ! त्यांच्या आगमनानं नुसत्या माणसाच्या मनांत असंतोशाचं वारं वाहातं अशा वेळा. तीहि अशीच संध्याकाळ होती. त्यावेळेस त्यानं आपल्या बायकोस घराबाहेर हाकलून लावलं होतं. पण त्या विरहाच्या निकडीच्या घडीपर्यंत त्याच्या घरांत फुलं उमलत होतीं. शेतांत वसंताचा नाच होता. आणि साऱ्या रात्रीं, ' मी तुझ्यावर प्रेम करीन, प्रेम कायम, अगदीं कधींहि तुला न विसरणारं प्रेम.' अशा शद्बांत गुंजत होत्या. त्याचं आयुष्य त्या वेळेंस विकसित झालं होतं. त्यानं आपल्या त्या उमलत्या जगांत आणि तिच्या नयनांच्या तळयांत त्याचं सारं विश्व आणि सूर्यचंद्र त्यांत साठवल्याप्रमाणं वाटलं. विश्वाला आणि सूर्याला साकार–रूप दिलं होतं. अशा वेळीं त्याचा तो मानवी तारूण्यांतील आनंद.... इव्हान ! त्यांच्या तारुण्यांतल्या खोडकर क्रीडांचं हेंच प्रतीक. मातेचे ते प्रेमळ डोळे जगांतील साऱ्या प्रेमळ मनांची साक्ष देत होतें. तिच्या त्या नयनाच्या आकर्षणानं तो 'नुकत्याच बाळंतपणांतून उठलेल्या पत्नीचे फिकट हात हातांत घेऊन चुंबनं घेत असे. त्यावेळेस त्याचं तें बालक तिच्या मांडीवर झोंपलेलं असे. तो लहानगा इव्हान, त्याचा पुत्र ! असं नेहमीं घडत असे. नंतर त्या दुःखद संध्याकाळीं आल्या. त्यावेळेस माणसांस अगदीं एकटं एकटं आणि उदास वाटतं अशी वेळ ! आणि या पृथ्वीवर अशी वेळ आली कीं त्याला भयाण वाटे. माणूसकीच्या मर्यादेचं तो उल्लंघन करीत असे.

खरं पाहिलं तर तीं संध्याकाळ नव्हती. तीं मध्यरात्र होतीं. खिडकीच्या बाहेर पाऊस जोरांत होता. आणि सगळीकडे आतां अंधार पसरला होता.

टेबलावर दिवा जळत होता. संध्याकाळपासून त्या दिव्याच्या ज्योतींत कांहींच बदल झालेला नव्हता. रात्रीं त्याचे डोळे रडून सुजले होते. आणि त्या खालीं आठया पडल्या होत्या. तो टेबलापाशीं उभा होता अन् ती दारापाशीं.

ती म्हणाली, 'इव्हान' मी काय म्हणतें तें समजून तर घे. हें सर्व खोटं आहे. माफ कर. मला दृढालिंगन दे. तुझ्या आलिंगनाकरितां मी आतुर झालें आहे.

तुझ्यांत आणि माझ्यांत भरपूर सुख आहे. आपण दोघं एकमेकांवर प्रेम करीत आहों.'

इव्हान इव्हानोविच टेबलावर वाकला होता. आणि आतां शंभर वेळां तो अगदीं गंभीर चेहऱ्यानं त्या कागदाच्या तुकडयांवरून नजर फिरवीत होता. त्यांत लिहिलं होतं, 'निकोली, तुझ्या गाढ मीलनाकरितां मी अगदीं अधीर झालें आहे रे.

'त्या वैषयिक जीवनाशिवाय मला चैन पडत नाहीं. माझा नवरा आज रात्रभर घरीं नाहीं. दारं उघडींच असतील, रात्रीं अकराला ये. सर्वच झोंपलेलीं असतील.'

इव्हान इव्हानोवनं कागदासह हात खिशांत घातला. नंतर दिव्यापासून दूर होऊन तो हळूच पहिल्या इतकाच गंभीर होऊन म्हणाला,

'अशा कृत्याला माफी कशी द्यायची? शब्दच शिल्लक राहिले नाहींत. मला आलिंगनांत आता मजाच वाटत नाहीं. आणि आतां आलिंगनांनीं होणार आहे तरी काय? कारण अगदी सोपं आहे. तूं माझं आंथरूण दुसऱ्या माणसाला घेऊन विटाळलं आहेस......निघून जा......चालती हो......'

'इव्हान लक्षांत ठेव, आपल्याला बाळ आहे......मुलगा!'

इव्हाननं तिला चिडविलं,

'माझ्याजवळ बंदूक आहे आणि मला आतां तूं काढलेलं अस्त्र नको आहे...चल जा नीघ!'

आतां तिच्या डोळ्याखालच्या आठ्या कमी झाल्या. मग ती त्याला डोळे दाखवूं लागली. त्यांत धीःकार, तिटकारा, त्वेष दिसूं लागला. तीहि त्याच्याशीं तितकंच मोकळेपणानं बोलूं लागली, 'प्रेम, नादान माणसा, मी त्याच्यावर प्रेम केलं, हो. केलं. आणि माझं प्रेम तुझ्यावर मुळींच नाहीं.'

इव्हान मागं सरकला. बोलला नाहीं. ती वेगानं बाहेर निघून गेली. दार आदळलं गेलं. तो तिच्या मागं गेला नाहीं. मागं सारी शांतता पसरली. पंधरा मिनिटं अशीच निघून गेलीं. आणि अशींच निघून जाती. तो आंतल्या

दारामागं पळत होता. पण त्या दारामागंहि शांतता. त्याच्या बाळाचं आंथरूण रिकामं होतं; तो तसाच बाहेर आला. अंगणांत सुवास पसरला होता. मानवता राहात असल्याचा सुगावा येत होता.

घरच्या दारापासून ते बाहेरच्या दारांपर्यंत सारीं दारं उघडीं. पुढच्या पटांगणांतून तो पावसांतून जाऊं लागला. रस्त्यावरलं दार सुद्धां उघडं दिसलं. असहाय्यतेनं तो मोठ्यानं ओरडला. अतिरंजीत पवित्रतेतून ते आवाज उठले.

' अलानुस्का. '

उत्तर कांहींच मिळालं नाहीं. रस्त्याची धांव अंधारांत नि पावसांत बंद झाली होती.

सकाळीं मोलकरणीनं एक चिठ्ठी आणली. ' इव्हान, इव्हानोविच निदान शेवटीं तरी चांगला वाग. आणि त्या चिठ्ठींत तिनं त्याला प्रार्थना केली होती कीं, तिच्या आणि तिच्या मुलाच्या साऱ्या जिनसा त्यानं पाठवून द्याव्या. तो सबंध दिवस त्यानं जिनसा जमविण्यांत घालविला. मोलकरणीनं त्याला मदत केली. मोलकरीण दोनदां जेवून व चारदां चहा पिवून बसली. पण हा सारा दिवस वस्तु जमा करण्यांत घालवित होता.

त्याला जेवण गोड लागत नव्हतं. मोलकरणीनं बघितलं, त्यानंतर तो एक लांबलचक पत्र खरडण्यांत मग्न झाला होता. संध्याकाळीं ती सारं सामान घेऊन गेली. आणि चोळींत तें लांब पत्र ठेवण्यासहि विसरली नाहीं. रस्त्याच्या दूरीपर्यन्त इव्हाननं तिची सोबत केली. नंतर तिला त्यानं उत्तर आण म्हणून वारंवार बजावलंहि. तो जेव्हां उत्तर आणायचं अगदीं पुन्हां पुन्हां सांगूं लागला तेव्हां ती म्हणाली,

' त्याचं काय मोठंसं ! जर तिनं दिलं तर मी आणीन. माझे पाय तर कांहीं तुटून पडले नाहींत ना ? '

त्या लांब पत्राचं उत्तर येणार नव्हतं आज ना येणार होतं उद्यां कीं येणार नव्हतं परवांहि...पण तीन दिवसानं त्याला समजलं कीं तिनं साऱ्या सामानासह कोणत्यातरी स्टेशनवरून शहर सोडलं. भवितव्य चांगलं बनविण्याकरितां ती दूर निघून गेली आहे.

इव्हान इव्हानोविच मग तिला कधींहि भेटला नाहीं. एक वर्षानंतर त्याला कळलं कीं ती मास्कोला राहात आहे. तीन वर्षानंतर त्याला कळलं कीं तिला दुसरा मुलगा झाला आहे. त्याचं नांव ' निकोली ' ठेवलं आहे. आणि त्या मुलाचं आडनांव सुद्धां त्याचं जें आहे तेंच ठेवण्यांत आलं आहे. ( इव्हान इव्हानोविच निकोली इव्हान... ).

त्या फाटलेल्या चामड्याच्या कोचामागें सिगारेटच्या थोटुकांचा ढीग सांचत आहे.

ती......त्या दोन मुलांची आई, इव्हान इव्हानोविचची बायको, तिनं आपल्या नवऱ्याशीं पुष्कळदा समेट घडवून आणला होता. जशा पुष्कळशा स्त्रिया आपल्या नवऱ्यांचा स्वभाव ओळखून त्यांच्याशीं तडजोड करून नादतात तसं तीहि करीत होतीं.

पण जेव्हां तो नवरा कांहीतरी लपवून बायकोशीं वागत असतो. अन् घरांतल्या मोकळ्या वातावरणांत दुष्टपणाचं धोरण स्वीकारतो तेव्हां स्त्री आपलें सर्वस्व गमावून बसतें. पहिल्यानदां त्याच्या अधिकारांतून दूर होतांना ते पाश तोडण्याच्या आधींच त्यांचं प्रेम त्यांच्या नाशास कारणीभूत होतं. खरं पाहिलं तर प्रेमाचीं बंधनं हीं बंधनं नव्हेत. आणि तसलं प्रेम तर अगदींच नाशकारक, प्रत्येक मानवी आयुष्य आणि मानवी प्रेमाचीं वर्णनं सारीं काल्पनिक आहेत. आपल्या नवऱ्याला सोडून दिल्यानंतर ती आपल्या डोक्याला लालभडक रूमाल बांधूं लागली. तंबाखूचा वास येत होता अशी उबट शाल पांघरूं लागली. त्या शालीच्या घडींत मानवी सुवासिकतेचा सुवास दरवळत होता. नंतर या शालीच्या घडया विस्कटल्या गेल्या.

ती शाल मास्कोच्या रस्त्यावरून आपली कर्मकथा सांगूं लागली. तिथल्या अफाट गर्दीत तीहि मिसळूं लागली. तिचा पहिला मुलगा अिव्हान तिच्या बहिणीबरोबर एका जिल्ह्याच्या गांवीं राहूं लागला. आणि तिचा दुसरा

मुलगा, निकोली पहिल्यापासूनच तिच्याबरोबर राहात होता. पण नंतर तिनं त्याला अनाथाश्रमांत पाठवून दिलं. सात वर्षांनंतर त्याला त्याच्या आयुष्यांत आजारीपणाचं दुःख कळलं. अनाथाश्रमांतील कठीण जीवन त्याला जाचूं लागलं. नंतर तिनं आपल्या मुलाला त्याच्या बापाचं रहस्य उघडं केलं. त्यानं आपलं नांवसुद्धां मुलाला ठेवूं दिलं नाहीं. कारण असेच मूर्ख बाप आपल्या मुलांना त्रास देत असतात. पुष्कळ विचार केल्यानंतर सुद्धां तिला कळलं कीं, आपल्या नवऱ्याच्या गैरहजेरींत आपल्याला आपल्या प्रियकराकडून मुलगा झाला हा आपलाहि नादानपणाच आहे. अशा प्रसंगावर मानवी न्याय इतका रुद्ध होणं शक्य नसतं जितका मानवी न्याय त्यांच्या स्वतःवरच अप्रत्यक्षरित्या लादला जातो.

नंतर त्यांची आई मेली. ती चांगल्या रितीनं मेली. आपल्या मुलांना आपल्याबद्दल प्रेम व आदर आहे असं पाहून तिन डोळे मिटले. दोघंहि इव्हानपुत्र एकमेकांपासून दूर राहात होते. निकोली आजारी पडत पडत अनाथाश्रमांत दिवस काढीत होता. विषमज्वरानं ती मेली. आपल्या स्वतःच्या जबाबदारीवर जीवन जगविण्याचा बाणेदारपणा तिनं दाखविला.

हीं मुलं एकमेकांला तर अगदींच ओळखत नव्हतीं. अनाथाश्रमांतील निकोलीला बरेच वर्षांनंतर एका जिल्ह्यांत राहणाऱ्या आपल्या बंधू इव्हानचं पत्र आलं. इव्हाननं आपल्या भावाला ओळखीदाखल पत्र लिहिलं आणि भावांचा सामायिक बंधुभाव व्हावा म्हणुन प्रयत्न केला. निकोलीनं उत्तर पाठविलं. इव्हाननं पत्रांत पुष्कळ लिहिलं होतं. त्याच्या गावांतील नदी, शेतांतील पीक, हायस्कूलमधील मुलं, त्याचे मित्र, पक्षी आणि सभोंवतालची हिरवीगार जमीन या सर्वांबद्दल त्यानं लिहून टाकलं होतं. बंधू निकोलीनं अनाथाश्रमांतील खोल्यांबद्दल, व्यापारी शाळा आणि त्याच्या आजारीपणांतील निष्क्रीय जीवन या पत्रांतून सांगून टाकलं होतं. नंतरच्या साऱ्या पत्रांतून निकोलीनं इव्हानला आपल्या आजारीपणाच्या गोष्टी लिहून टाकल्या होत्या. मग प्रत्येकजण एक दुसऱ्याला साग्र हकिकत कळवित असे. दोघांच्याहि मनांत आपल्या मातेची स्मृति ताजी होती. आणि जेव्हां इव्हान चौदा

वर्षांचा झाला आणि त्याच्या आईनं त्याला बाप असल्याची हकिकत सांगितली तेव्हां इव्हाननं निकोलीला पत्र पाठविलं त्यांत त्यानं बाप असल्याची बातमी कळविली. ह्या बातमीचा निकोलीसमोर एक विचित्र पेंच पडला. ( आणि त्याचा बहुतेक तसाच कयास झाला असावा ).

निकोली आपल्या बापाबद्दल निरनिराळे तर्कवितर्क रचूं लागला. जी गोष्ट त्याच्या आईनं अनाथाश्रमांत सांगून टाकली होती. त्याबद्दल निकोलीनं आपल्या मनांत कांहींतरी लपवून ठेवलं होतं. त्याची बापाबद्दलची संथ गूढता आणि त्याच्या आनुवंशिक स्मृतींतून असलेलं एक रक्ताचं नाजुक सबंध हें सारं लक्षांत घेऊन इव्हाननं आपल्या बापाला पत्र लिहिलं. बापानं त्याच्या पत्राला उत्तर लांबलचक आणि प्रेमळपणानं दिलं. इव्हाननं तेंच पत्र निकोलीला पाठविलं. निकोलीनं इव्हान–इव्हानोविच इव्होनोवला पत्र लिहिलं पण त्याला उत्तर मिळालं नाहीं.

( इव्हान व निकोलीच्या गोष्टींतलं आतांपर्यन्तचं आयुष्य नि घटना रशियन क्रान्तीकालीन आहेत ).

मानवी जीवनाचीं दहा वर्षे म्हणजे कांहीं जास्त नाहींत. पण मानवी जीवनांतील दहा दिवस म्हणजे केवढा भयंकर काळ ! इव्हान इव्हानोविच इव्हानोव सिगरेटची जास्त जास्त थोटुकें त्या चामड्याच्या कोचामागं जमवूं लागला. त्याच्यापुढं शहरांतील सारीं घरं पसरलीं होतीं. त्यांच्या भोंवतालच्या कुंपणांतून रस्त्यावर यायला दारं आहेत. त्यांच्या घराशीं बगिचे आहेत. त्यांतूनहि सुवास दरवळत आहे. आणि त्यांच्याहि खिडक्याखालीं गवत उगवलं आहे. आतां सांगायचं कारण नाहीं कीं अिव्हान अिव्हानोविच एका हायस्कूलमध्यें शिक्षक होता किंवा असेल. त्यांच्या आयुष्यांत वारं वाहूं लागलं. त्यांत मानवी श्वास मिसळला होता. आणि तिथं त्या त्याच्या नीरस जीवनांत इव्हान इव्हानोविचला इव्हानची त्याच्या मुलाची आठवण झाली.

तें पत्र त्याला एका सकाळीं मिळालं होतं. त्याची पहिलीच ओळ अशी होतीं कीं, ' प्रिय पपा, मी तुम्हांला भेटत आहे. ' त्या वेळीं इव्हान दहा महिन्याचा होता. त्याला मुलाची आठवण झाली. ताज्या गवतासारखं त्याचं कोमल शरीर, वसंत ऋतूच्या वादळांतील तीं वर्षे. त्याला अंधूकपणानं ती भयंकर रात्र आठवली. त्या वेळेस तो एका दारांतून दुसऱ्या दारांत पळत होता. मोठ्या दारांतून बाहेर पडला. त्या अंधारांत रस्त्यावर जाऊन तो मोठ्यानं ओरडला होता, ' अलानुस्का. ' तो त्या दिवसापासून सारखा रडण्याच्या प्रयत्नांत होता. अगदीं जोरानं. अगदीं समाधानानं. अगदीं आनंदानं. सारं विसरून गेलेल्या समाधानानं. नंतर त्यानं आपल्या मुलाला लांबलचक पत्र पाठविलं. लौकरच त्याला दुसरं एक पत्र मिळालं होतं.

तें निकोलीचं होतं. अिव्हानच्या पत्रासारखी त्याचीं सुरवात होती, 'प्रिय पपा, मी तुम्हाला भेटत आहे.' त्याचं रक्त पुन्हां सळसळून आलं. अगदीं तिरस्कारानं त्याला त्या प्रकाराची आठवण, माणुसकी विसरून गेलेल्या त्या प्रसंगाची आठवण झाली. त्याला आतां जास्त जास्त रडूं येऊं लागलं, ' निघून जा, चालती हो, तुझ्या त्या माणसाकडे.......मला अशी घरबसवी बायको नको आहे. '

या गोष्टीहि अशाच पावसाळ्या रात्रीं घडल्या होत्या. जेव्हां पावसाची एकसारखी झड सुरू असते तेव्हां रात्रीं लौकरच दिवे लावावे लागतात. आणि एका ठराविक क्रान्तीच्या गर्जना ऐकूं येत होत्या त्यावेळेस हें घडलं. त्याचं मोठं दार उघडलं गेलं. दिवाणखान्यांमधून जाणाऱ्या रस्त्यांतून फरशीवर काठीचा दणदण आवाज ऐकूं येऊं लागला. दिवाणखान्याचं दार उघडलं गेलं. कोणीतरी शांतपणें विचारलं,

' जरा कृपा करून इव्हान इव्हानोविच इव्हानोव कुठं राहतात तें सांगाल काय ? '

' हो. इथंच, मीच आहे तो. ' इव्हान इव्हानोविच म्हणाला. काठीला रबराची पकड असलेला एक बुटका मनुष्य आंत आला. त्याचे खांदे उंच

झाले. आणि प्रकाशांत त्याचा चेहरा फिकट दिसूं लागला. तो थकून गेला होता. हें शब्द ऐकतांच त्यानं आनंदानं उंबरठा ओलांडला. लवून म्हणाला,

'इव्हान इव्हानोविच तुम्हींच तर?' त्याचे हुंदके अनावर झाले. त्यानं आपला हात पुढं केला. त्याची काठी खालीं पडली.

'पपा—मीच तो—तुमचा—तुमचा मुलगा—निकोली.'

इव्हान इव्हानोविच टेबलापाशीं ज्यावरील वरचा कपडाहि विटून गेला होता तेथं उभा राहिला. त्यानं अभिवादन केलं नाहीं. उत्साह दाखविला नाहीं. तो निकोली पासून दूर बाजूला गेला. त्याला तीच मागची भयाण आणि दुःखी रात्र पुन्हां आल्याचा भास झाला. तो शांतपणें म्हणाला,

'खालीं बैस. तुझं स्वागत कसं करूं.' निकोलीनं उत्तर दिलं नाहीं. तो एखाद्या निष्पाप बालकाप्रमाणं दाराजवळच्या खुर्चीवर बसला.

निकोलीला बापाचा प्रश्न कांहींच समजला नाहीं. तो गडबडीनं कांहीं बोलणार होता.

'तुझं स्वागत कसं करूं.' इव्हान इव्हानोविच तडकलेल्या आवाजांत-म्हणाला.

'माफ करा पण मला कांहींच समजत नाहीं......'

इव्हान इव्हानोविच आपली खुर्ची सरकावीत निकोलीपुढं येऊन बसला. त्यानं काठी उचलून निकोलीला दिली. तो अगदीं खोचक नजरेनं मुद्दामच निकोलीकडं बघूं लागला.

तशीच त्याच्यावर नजर रोखून तो बोलूं लागला, 'मला तुमच्या जन्म-कथेबद्दल कांहींच माहिती नाहीं!' तो पुन्हां उद्वेगानं म्हणाला.......'माफ करा पण हा सारा गैरसमज दूर करण्याकरितां माहिती सांगायला हवी. तुम्ही नुसत्या गैरसमजुतीनं माझं नांव लावलं आहे. मला माहित नाहीं कोण तुमचा......' इव्हान, इव्हानोविच येथं थांबला – आणि सिगार केस त्याच्यापुढं करीत म्हणाला, 'सांगाल? सिगरेट ओढता—नाहीं. बरं—माफ

करा मला. मग मला तुम्ही सांगणार नाहीं काय—कोण तुमचा जन्मदाता—बाप—'

निकोली उठला. इव्हान इव्हानोविच उठला. काठी पुन्हां खालीं पडली. त्यानं पुन्हां त्याच्या हातांत दिली. आतां इव्हान–इव्हानोविचनं आपले डोळे मिटून घेतले.

'सांगा – हं – माफ करा ! मला मान मिळेल कां ? मला त्याच्याशीं कांहींच करावयाचं नाहीं. मला हें कळण्याचा बहुमान मिळेल ? कुणाशीं कुणापासून तुमच्या आईला तुमचा भार सहन करावा लागला ! ' आतां कांहीं जास्त ऐकण्याकरितां निकोली थांबला नाहीं. त्यानं तांतडीनं खोली सोडली, तो उजव्या पायावर जास्त भार देत नि उजवा खांदा उडवित, उजव्या हाताच्या काठीवर भार देत वेगानं निघून गेला.

'हो—हो—मला त्याचा बहुमान मिळणार नाहीं—नाहीं !' तो निकोली गेल्यानंतर जोरानं ओरडूं लागला.

बाप राहात होता त्या गांवच्या हॉटेलांत इव्हान आणि निकोलीनं भेटण्याचं ठरविलं. निकोली पुष्कळ वेळ आधींच येऊन उतरला होता. इव्हान स्टेशनावरून हॉटेलांत गेला. त्याला कळलं त्याचा भाऊ बऱ्याच वेळापासून येथं आला आहे. ते आयुष्यांत पहिल्यांनदां भेटत होते. तो खोलींत शिरला. टेबलावर दिवा जळत होता. इव्हान उंच, मजबूत आणि सैनिकाच्या पोषाखांत होता आणि त्याला कर्नलाचा हुद्दा मिळाला होता. टेबलावर दिवा जळत होता. खोलींत कुणीच दिसलं नाहीं. त्यानं अगोदर पाठविलेल्या आपल्या सैनिकाला विचारलं, 'माझा भाऊ कुठं आहे ?'

सैनिक म्हणाला,

'ते बाहेर कुठं गेले ते मला माहित नाहीं.' नंतर इव्हाननीं कोंपऱ्यांत मान घालून बसलेल्या माणसाला बघितलं. मजबूत हाडापेराचा, नि थेट लष्करी वेषांत असलेल्या इव्हाननं त्याच्या दंडाला धरून उठवित प्रेमळपणानं म्हटलं,

' प्रिय निकोली काय झालं आहे काय ?'

निकोली हळूच म्हणाला,

'कांहींच नाहीं तसं.' मला बरं वाटतं. मी गेलों होतों... तो अडखळला. 'तुझ्या बापाकडे—इव्हान इव्हानोविचकडे मी गेलों होतों. त्यांनीं सांगितलं आपली आई—त्यानां माहित नाहीं कोण माझा बाप आहे तें. आणि ते म्हणाले, मला मांहित नाहीं कुणापासून तूं जन्मलास तें—'

'काय ?......आपली आई......?'

खोलींतल्या टेबलावर दिवा जळत होता. शक्तिवान माणसानं अशक्त माणसाच्या दंडाला धरलं होतं. खिडकीच्या बाहेर अंधारांत जाणारा रस्ता दिसत होता. टेबलावरील दिव्याच्या जवळ सिगारेटचीं थोटकं पडलीं होतीं. लौकरच दोघे अशक्त व सशक्त माणसं जमिनीवरच ऐस पैस बसले होते. आणि अशा रितीनं दोघे भाऊ भेटले. ते दोन मानवी जीव आयुष्यांत कधींच एकमेकाला भेटले नव्हते त्यांची आज भेट झाली.

ते आपल्या आईबद्दल बोलूं लागले. त्यांच्यापैकीं एकच तिला चांगलं ओळखत होता. आणि त्याच शहरांत राहणारा मानवी जीव आणि ज्याला भेटण्याकरितां ते आले होते, ते त्याच्या बाबतींत औदासिन्यानं बोलूं लागले. ते त्याला नादान ठरवूं लागले. आणि त्यांच्या मातेच्या पवित्र शीलावर शंका घेणारा तो नादानच नव्हता का ?

शहरांतील फरसबंदी जमीन फक्त चालणाऱ्या माणसांकरितांच नसतें. तर ती साऱ्या जिल्ह्यांतील बातम्या इकडून तिकडे फैलवायलाहि मदत करितें. आणि हा इव्हान इव्हानोविच इव्हान एक मानवी जीव, त्याचं जीवन माणुसकी–विरहित होतं. त्याला त्या दुसऱ्या रात्रीपर्यंत थांबावं लागणार आहे. कीं जेव्हां सारीं दारं उघडीं होतील. ती रात्र आलिंगनाची होईल. पण त्या आलिंगनाच्या रम्य रात्रीं ! त्या निघून गेल्या. बायकोला त्या रात्रीं बाहेर घालवुन तो त्या रात्रींनांहि घालवून बसला. रस्ता अंधारांत जात होता. जमीन पावसाचे अश्रू वाहात होती. आणि इव्हान–इव्हानोविच मुलाच्या येण्याची

प्रतिक्षा करीत फाटकापाशीं उभा राहिला. त्याचा मुलगा इव्हान तो त्या मास्काव्ह हॉटेलच्या एका कोंपऱ्यांत आपल्या प्रेमळ भावांशीं बोलण्यांत गुंतून गेला होता. इकडे पिता–इव्हान कंटाळला. त्या अंधारांत मोठयानं ओरडला.

' अलानुस्का ! '

इव्हान आपल्या बापाकडे आला नाहींच. सकाळीं बाप इव्हाननं आपल्या मुलांना बघितलं—एकदांच आणि शेवटल्या वेळेला. रेल्वे स्टेशनांतल्या मोठ्या जमावांत तो उभा होता. दोन मानवी जीव त्याच्या जवळून निघून गेले.

एक काठीवर टेकत चालणारा व दुसरा लष्करी वेषांत असलेला. लष्करी वेषांत असलेला माणूस सुंदर होता. त्याचे गाल लालबुंद होते. हाडापेरानं मजबूत होता. बापानं बघितलं त्या तरुण मुलांचे डोळे त्याच्या अगदीं आईसारखें होतें. त्या नयन तळयासारखें ज्याला एकाच वेळीं जग आणि सूर्य साठवला आहे असं वाटत असें तसें. आगगाडीनं हळूच स्टेशन सोडलं. मागं धुराचे लोट सोडीत आणि शिटी देत गाडी निघून गेली. बाप त्या शहरांतल्या फरसबंदी रस्त्यावरून चालूं लागला. कितीतरी घरावरून तो जात होता. रस्त्यावर वारं वाहत होतं. त्या रस्त्यावरून त्या फरसबंदीवरून पांढऱ्या केसांचा माणूस निराशेनं जड पावलं टाकीत चालला होता.

बाजूंच्या साऱ्या घरांतून सूज्ञ माणुसकीचा आवाज निघत होता.

कांहींका असेना. मानवी जीवनाचे नियम इतके कटुतर असतात कीं त्यावर मानव निर्मीत न्याय मात करूं शकत नाहीं. त्याला विजय मिळत नाहीं.

---

# त्याची चांचणी ⁘ • • ५

खजिनदार डिबिट्रावनं तो सारा आठवडा प्रश्नोत्तराचा कागद तोंडपाठ करण्यांत घालविला.

सगळ्यांत मोठा शिक्षक कोण ?

मार्क्स.

जीवनविषयक गुंतागुंतीचे प्रश्न सोडविणारी संस्था कोणती आहे ?

S. T. U. ( सोवियत ट्रेड युनियन ).

सोशालीस्टाचं देशप्रेम कोणतं ?

समाजवादाच्या नांवाखालीं पांढरपेशांची सेवा करणं !

भांडवलशाही कोणती गोष्ट स्पष्ट दाखवितें ?

वैयक्तिक मालमत्ता ताबडतोब नष्ट करणं !

अर्थशास्त्राची प्रगति अन् तिचं कार्य काय ?

विद्युत वेगावर आधारलेलीं प्रचंड औद्योगिक वाढ.

निरनिराळे देश केव्हां अन् कोणत्या मतावर येऊन मिळाले ?

१८८९ मध्यें पॅरीसमध्यें भरलेली दुसऱ्या आंतरराष्ट्रीय बैठकीची पहिली कॉंग्रेस.

भांडवल किती प्रकारचं असतं ?

जमा केलेलं नि व्यवहारांत असलेलं.

भावी समाजवादी जगांत कोणत्या प्रकारची घटना नि व्यवस्था अमलांत येईल ?

तें माहित नाँहीं.

पार्टीचा विरोधक कोण आहे ?

कॉटस्की—

प्रतिनिधी कोण आहे ?

पेनलॉव्ह.

उमेदवार कोण आहे ?

लाफोलेटी.

कामगार राज्याच्या ऐश्वर्यावर घाला घालणारा जवळचा कोणता साम्राज्यशाही देश आहे ?

पोलंड.

समाजांतले धोकेबाज माणसं कोण आहेत ?

शिडमान व नोस्के

ॲब्रोमोवीच कोण आहे ?

एक मूर्ख मेन्शेविक !

ही प्रश्न-मालिका तोंडपाठ झाल्यानंतर उत्साही डिमिट्रीवनं तो कागद चुरगाळून खिशांत घातला. आतां तो कागद पुन्हां त्याला वाचावासा वाटेना.

तो ओठांत हळू हळू शब्दांत पुटपुटूं लागला, ‘पुन्हा आतां मी चुकणार नाहीं. प्रतिनिधी कोण ? पेनलॉव्ह. विरोधक कोण ? कॉटस्की. अन उमेदवार ? ला फॉलेटी !’

शेजारच्या खोलींत अधिकाऱ्याचं शिष्टमंडळ येऊन बसलं होतं व बाहेर रांगेनं उभ्या असलेल्या उमेदवारांची बोलावून चाचणी घेण्यांत येत होती.

आतां डिब्रिट्रावचा नंबर लागला. त्याला आंत बोलावलं. आंत येतांच गुलाबी फुलांचा सुवास सुटला. त्याच्या कानांत घंटीचा मधुर आवाज गुंजूं लागला. डिब्रिट्राव उतावीळ असल्यामुळें भिवूं लागला. आपले अर्धवट बंद असलेले डोळे तो मधून मधून लावूं लागला. तो टेबलाजवळ येऊन थरथर कांपत उभा होता.

शिष्टमंडळाच्या अध्यक्षानं विचारलं, ‘कॉम्रेड, तुझं आडनांव काय आहे ?’

“—मार्क्स”

‘तुझं वय काय ?’

‘स्टो ( शंभर )’

‘अन् धंदा काय करतोस ?’

‘समाजवादाच्या नांवाखालीं पांढरपेशांची नोकरी’ अध्यक्ष जो आतांपर्यंत त्याला प्रश्न विचारण्यांत विशेष दक्ष नव्हता त्यानं हें उत्तर ऐकून आपली एक भुवई वर चढविली व त्याच्यावर नजर रोखली.

‘फार छान देतोस प्रश्नाचं उत्तर.’ अरे, पण अशा नागरिकांची सेवा करण्याचं तुझं नातं तरी काय आहे ?’

‘वैयक्तिक मालमत्ता तावडतोब नष्ट करणं.’

‘प्रिय माणसां......फारच छान.........या सोवियत राज्यव्यवस्थेंत तूं घुसलास तरी कसा ?’ ‘विद्युत्वेगावर आधारलेली प्रचंड औद्योगिक वाढ.’

मध्येंच शिष्टमंडळाचे सभासद एकमेकांकडे पाहूं लागले. चिटणीसानं मध्येंच प्रश्न विचारला,

'आणि या साऱ्या तापदायक व्यवहारांत तूं पडलास तरी कसा ?'

'१८८९ मध्यें पॅरीसमध्यें भरलेल्या दुसऱ्या आंतरराष्ट्रीय बैठकीची पहिली कॉंग्रेस.' खजिनदार जोर देऊन उत्तरला.

'कॉम्रेड, तुझ्या डोळ्यांत ज्वर आल्यासारखी चमक दिसत आहे.' अध्यक्ष त्याला नम्रपणानं म्हणाला.

'जमा झालेली अन् व्यवहारांत असलेली.' त्यानं त्याचं स्पष्टपणें उत्तर दिलं. आपण भराभर उत्तर देत आहोंत या विजयांत त्याचे कान शिकारी कुत्र्याप्रमाणें फुलून गेले होते. त्याचा डावा पाय एकसारखा थरारत होता. त्याचे दांत खटाखट वाजत होतें आणि त्याची बोटं खिशांतल्या चुरगाळलेल्या त्या कागदाशीं चाळा करीत होतीं.

अध्यक्ष प्रेमळपणानं त्याला म्हणाला, 'फार छान, अगदींच सुंदर. पण कॉम्रेड, खरी गोष्ट अशी कीं तूं मेंदूला इतका त्रास देऊं नकोस. तूं थकून गेला असशील, खालीं तर बैस.'

पण डिब्रिट्राव अध्यक्ष आपल्याला प्रश्न विचारीत आहे असं समजून त्याचं उत्तर शोधण्याचा तो विचार करूं लागला. अध्यक्षाचं वाक्य संपतांच तो डिब्रिट्रावला विचारूं लागला, 'कॉम्रेड आजची तारीख कोणती ?'

समोरील प्रश्नाचं मघापासून उत्तर शोधण्यांत गढून गेलेल्या डिब्रिट्रावनं जोरांत उत्तर दिलं, 'माहित नाहीं.' असं म्हणून त्यानं कपाळावरचा घाम पुसला आणि 'कसा दिला कीं नाहीं शत्रूला अखेरचा टोला' अशा अभिनयानं तो अध्यक्षाकडे बघूं लागला.

शिष्टमंडळाचे सभासद आपापसांत कुजबुजूं लागले आणि त्यांच्यातला अद्यावत् पोषाखांत असलेला चिटणीस बाहेर पडला.

अध्यक्ष पुन्हा अत्यंत प्रेमानं अन् विशेष दक्षतेनं म्हणाला, 'कॉम्रेड, अगदीं आनंदायी ! फारच सुंदर ! पण कांहीं असलं तरी मेंदूला तूं जास्त ताण देवूं नकोस. तुला याल्टाला जायला परवानगी दिली आहे. तिथं उन फार आहे प्रकृतीला सांभाळून अस. जास्त त्रास घेवूं नकोस. बरं ये तर सलाम, कॉम्रेड.'

डिमिट्राव जरासा गोंधळला अन् हळूंच ह्मणाला, 'मला बाकीचं सुद्धां सारं माहित आहे. आपला विरोधक कोण? कॉटस्की. प्रतिनिधी कोण?...... .........पेनलॉव्ह. उमेदवार कोण? लाफालेटी. कामगार राज्याच्या ऐश्वर्यावर घाला घालणारा जवळचा कोणता साम्राज्यशाही देश? पोलंड.'

अध्यक्ष टेबलावरून पुढें वाकून त्याला थांबवित ह्मणाला, 'बाबारे, विनाकारण डोक्याला त्रास देऊं नकोस. तुझ्या प्रत्येक शद्वावर आमचा विश्वास आहे. सलाम, कॉम्रेड. जा आतां.'

डिमिट्रावनं आपलं शीर वाकवून अभिवादन केलं—अन् बाहेरच्या दारापाशीं आल्यावर तो मोठ्यानं हंसला. अन् थांबला. शिष्टमंडळावर एक नजर टाकीत ह्मणाला, 'कांहीं प्रश्नांची उत्तरें द्यायची राहिलीच—समाजांतले धोकेबाज कोण? शिडमान अन् नोस्के. अब्रामोवीच कोण?' इथं तो बराच थांबला अन् बाहेर निघतांना ह्मणाला, 'मूर्ख मेन्शेविक!'

बाहेर चांचणीकरितां बोलाविलेले उमेदवार डिमिट्रावभोंवती आतुरतेनं जमा झाले.

'बरं कशी झाली तुझी चांचणी? काय दिलींस उत्तरं अन् किती?'

'अरे बाबानों, मी घोकलं होतं खूपच. आठ प्रश्नांचीं उत्तरं नीट नीट दिलीं व बाकीचे सहा प्रश्न अन् त्यांचीं उत्तरं मीच देऊन टाकिली. माझ्यावर विश्वास ठेवा. अध्यक्ष सुद्धां माझ्या उत्तरावर बेहद्द खूष अन् चकीत होऊन खुर्चीत रेलला. मला याल्ताला जायला रजा मिळाली व बघा आतां उद्यां मी इथून कूच करणार!'

---

# लेनिन ❖ • • • ६

टेलीफोन जवळच्या पार्टीशन मागें दबकून हुगज आणि मोरसेस लेनिन आपल्या खाजगी खोलींत जात असल्याचं बघत होते. लेनिन सरळ जाऊन टेबलाशीं बसला आणि मोकळया नाजूक व गोल अक्षरांत एका कागदाच्या तुकड्यावर त्यानं लिहायला सुरवात केली.

फेलीक्झ इद्मंदोविच,

मला वाटतं आतां आपण याकोव मिर्कोलोविच बरोबर शेवटची व्यवस्था करावी. ही गोष्ट अत्यंत जरूरी आहे. (१) आतां उघडपणें काम करायला थोडासासुद्धां वेळ दवडतां कामा नये. (२) लष्करी अधिकाऱ्यांकडून सर्व व्यवस्था काढून घेण्याची कृपा करावी. (३) मध्यवर्ती कम्युनिस्ट पार्टीच्या वतीनं हे सर्व ठराव पास करून घ्यावे. कार्यास सुरवात करावी.

साम्यवादी क्रान्तीचा चाहता,

तुमचा,

—लेनिन.

लिहून झाल्यानंतर त्यानं आपल्या टेबलावरची घंटा वाजविली. रांकट चेहऱ्याचा एक तरुण कामगार चिटणीस आंत आला. लेनिननं स्वतःच पत्र पाकिटांत बंद केलं. तें त्यानं चिटणीसाच्या हवाली केलं. नंतर तो उठून टेलिफोनपाशीं आला. रिसिव्हर मधून तो आरझाम्सशीं बोलूं लागला. कुणालाहि हेंच ऐकूं आलं असतं, 'काय ? हॅलो ! काय शहराचं केंद्र अजूनहि आपल्या ताब्यांत आहे ? आपल्या हातांत ? रॅशोल्त तिथं आहे ? काय ही खुषखबर मी ऐकत आहे ! किती आनंद होत आहे ! अजूनहि केन्द्र ताब्यांत आहे ! कामगार सशस्त्र आहेत ? हॅलो ! पण कोणत्या बाजूनं — लेशावकडून का ? बरं पुन्हा दोन तासानं मला फोन कर हं !'

आणि पुन्हा जेथून हुगज आणि मोरसेस बघत होते. तिथून तो आपल्या खासगी खोलींत परतला.

आणि लेशावनं त्या केन्द्रांत आपले सशस्त्र कामगार घेऊन बोल्शेविझमच्या निशाणाखालीं बड्या बड्या विरोधी धेंडांची कत्तल चालविली होती. कामगार क्रान्तीशीं विरोध दाखविणाऱ्या लोकांच्या तंगड्यावर, तर कुठं छातीवर गोळ्या झाडल्या जात होत्या. त्यांची नाकं आणि कान कापलीं जात होतीं.

—इकडे कझान प्रांतांत शेतिकिनच्या घरांत काय चाललं होतं ? त्याच्या घराच्या मोठ्या दिवाणखान्यांत गुप्त सभा भरत होत्या. पार्टीच्या लोकांनीं काय काय करायचं आणि मिळविलेल्या धनाची कशी काय व्यवस्था ठेवायची या विषयावर कोणी हतबुद्ध होत असत तर कोणी हिंमत देणाऱ्या सूचना मांडीत असत.

—आणि वारोकोवकडून निळ्या पोषाखांत कामगारांच्या तुकड्या अलफूझ व क्रेस्तोवनिकोच्या प्लॅन्टस ताब्यांत घेण्याकरितां कझान जंगलांत रवाना झाल्या होत्या.

निझीनोवोग्रादची अत्यंत मोठी 'अलिगामोरोमिश' नांवाची विमानें कझान आणि समारा प्रांतावर उडण्याकरितां एकत्र जमा झालीं होतीं.

—आणि मास्को सोवियत बिल्डिंगच्या समोरच्या प्रशस्त चवाठ्यावर सशस्त्र कामगार शेतकऱ्यांची लाल सैना उभी होती.

लेनिनला भेटण्याकरितां व आघाडीवर निघण्याकरितां ती तयार होती.

त्यांनीं टेलीफ़ोनवरून लेनिनला बोलावलं आणि तो त्यांना टेलीफोवरूनच वारंवार सागत होता, ' हा आलोंच, होतोंच हजर.' पण तो आला नाहीं. ॲण्ड्रो-निकोव या साऱ्या जमलेल्या लाल सैन्याचा सेनापती होता. आणि तो या फौजेला घेऊन आघाडीवर जाणार होता. त्यानं मास्को सोवियत बिल्डिंगच्या आवारांतलीं मोटार घेतली. रांकेत उभ्या असलेल्या लाल सेनेला जराहि न हालवितां त्यानं आपली मोटार क्रेमलिनकडे वळविली.

पण कुताविया टॉवरच्या अगदी जवळ त्याला समोर येणारी मोटार दिसली. त्या मोटरींत उजव्या बाजूच्या कोपऱ्यांत वाकून लेनिन बसला होता. त्यानं काळी घडीची हॅट घातली होती. ॲण्ड्रोनिकोवला बघतांच लेनिन मोटारीच्या त्या कोपऱ्यांतून या कोपऱ्यांत आला. नि ओरडूं लागला, 'ॲण्ड्री, ॲण्ड्री, अरे तूं माझ्याच शोधांत का ? मी येत आहे. हा बघ येत आहे.'

दोन्ही मोटारी जवळ जवळ आल्या. लेनिननं आपली गाडी थांबविली. ॲण्ड्रोनिकोवनं लेनिनला आपल्या मोटारींत बसवून घेतलं.

ॲण्ड्रोनिकोवला वाळूच्या रंगासारखें चेहरे नेहमीं आवडत. त्यांच्या त्या घट्ट कपाळावर बुद्धिवादी जिज्ञासेच्या पढलेल्या आठ्या, लांबट आणि गोल नाक, काळे पण आकर्षक दिसणारे हे सर्व विद्यार्थी त्याला फारच आवडत.

सर्व साधारणपणें डोळ्यांची चकाकी लक्षांत न घेतां असे चेहरे नित्याचे दिसतात. पण पाहाणारांची दृष्टी जेव्हां चेहऱ्याच्या रांकटपणाला दुर्लक्षून त्यांच्या नयनांतल्या आकर्षणावर स्थिर होते तेव्हां तीं माणसं असमाधानी आणि उद्दिम भासूं लागतात. त्यांच्या प्रेमळपणांत आणि आज्ञाधारक वागणूकींतसुद्धां कुठून तरी त्यांच्या चेहऱ्यावर खोल हास्याचा झरा वहात असतो. ते हास्य आनंददायी नि प्रखर वाटतं. ॲण्ड्रोनिकोवला हे पहिल्यांदा कांहीं समजलं नाहीं. पण पेन्‌ची नि त्याची जेव्हां जानपछान झाली तेव्हां त्याला या अतीव भावना

लक्षांत आल्या. आणि हे सर्व गुण, प्रेमळपणा नि अज्ञाधारकत्व जेव्हां सामान्य माणसांत मिसळतात — आणि हे सर्वसामान्य दिसणारे गुण लेनिनमध्यें व त्याच्या आवती भोंवती फिरत होते. या अगदीं सरळ आणि सामान्य गुणावरच ॲण्ड्रोनिकोव लेनिनवर बेहद्द खूष होता.

आणि लेनिनहि ॲण्ड्रोनिकोववर खूष होता. ह्मणूनच कीं काय त्याच्या भोंवताली असणारे चेहरे त्याला नेहमीं विचारीत, आणि लेनिन आहे तरी कशा प्रकारचा माणूस ?

वाऱ्यानं उडून जाऊं नये म्हणून लेनिननं आपली हॅट डोकीस घट्ट बसविली. व पुन्हा तो मोटारीच्या उजव्या बाजूला टेकून रेलला.

त्यानं ॲण्ड्रोनिकोवला विचारलं, 'तुला काय वाटतं; ते कझान–हस्तगत करतील कीं नाहीं ?'

'मिळालं तर मोठ्या मुष्किलीनंच मिळेल.'

'पण तिथं जोम कितपत आहे ?'

'तसा लोकांचा जोम तर चांगलाच आहे. विद्यार्थ्यांना संकटाची चांगलीच कल्पना आहे.'

पण लेनिन ॲण्ड्रोनिकोवचं उत्तर ऐकतच रेललेला नीट बसला. त्यानं आपला डावा डोळा अरुंद केला. उजवी भुवई वर नेली. आणि त्याच्या बसण्याच्या बाजूकडे थोडसं झुकत नि आपला उजवा कान त्याच्याकडे देत तो त्याचं ह्मणणं ऐकूं लागला. तसेंच त्याला तो प्रश्नहि विचारूं लागला. लेनिन आपलं ह्मणणं इतकं लक्ष देऊन ऐकत आहे असं ॲण्ड्रोनिकोवला वाटलं तेव्हां त्यानं बोलताना विशेष मनमोकळेपणा दाखविला.

ॲण्ड्रोनिकोव बोलूं लागला, 'हो. त्यांना कल्पना आहे त्याची. आणि त्यांतल्यात्यांत त्या संकटाची तर कामगारांना विशेष जाणीव आहे. कांहींहि असो पण आतां ह्याकरितां लाल सेनाहि तयार झालीच आहे.'

'आपण उभारलेल्या या मोठ्या लाल सेनेबद्दल त्यांचं धोरण काय आहे ?'

'नुसतं सहानुभूतीचं ! पण कांहीं जरी असलं तरी आह्मांला पुढं धकांयलाच पाहिजे.' या वेळापर्यंत त्यांची मोटार सोवियत बिल्डिंगच्या आवारांत येऊन दाखलहि झाली.

लेनिननं आपल्या सवयीप्रमाणें मोटार साधारण हळूं चालत असतांनाच त्यांतून उडी घेतली. तो पळत पळतच जिन्यावर चढला आणि दिवाणखान्यांत येऊन जागा पटकावली. ॲण्ड्रोनिकोवनं मोठ्या मुष्कीलीनं त्याच्या बरोबर तितकी मजल मारली.

नंतर ते दोघंहि बाहेर मोठा चवाठा दिसणाऱ्या इमारतीच्या बालकनींत आले. खालीं मोठ्या चवाठ्यावर जराहि शिस्त न सोडतां लाल सेनेचं पथक उभं होतं. ॲण्ड्रोनिकोव लेनिनजवळ बाल्कनींत उभा होता. तो गंभीर होता. त्याचे निळे डोळे चकाकत होते. त्याचा चेहरा अती जाग्रणानं नि अन्न न मिळाल्यानं फिकट पडला होता. तरी बाहेरून पहातां जास्त कणखर नि जास्त स्फूर्तीदायी दिसत होता. नवीन चामड्याच्या कोटावर मासळीचा कशिदा काढून त्याला वैचित्र्यपूर्ण बनविलं होतं—पण तो तसल्या कोटातहि छान दिसत होता. तो इतका खूष होता कीं, त्याच्या खांद्यावर दृष्टी जातांच नव्या जाणिवांचा भास होत होता. आणि त्याची छाती, दंड आणि ॲण्ड्रोनिकोवचं हृदयसुद्धां कांहींतरी नवीन, नवं जग दाखविण्याकरितां स्फुरण पावत होतीं. सारी आणि सारी माणसं त्याला अगदीं निराळी वाटत होती! नवी आणि ताजी! जुन्या जगाकडून ज्यांचा पदोपदीं धिक्कार करण्यांत येत आहे तो, पण सर्वांचा लाडका–प्रिय–इल्यीच–त्यांच्यापुढें बालकनीवर हात टेकून भाषण देऊं लागला. तो अधून मधून उजविकडे वाकत होता. आपल्या अंतःकरणांतून अगदीं खोल उमाळा येऊन अेक अेक शद्ब ओढून ओढून अगदी पिळवटून तो बोलला. ज्या नव्या शक्तीच्या प्रेरणेनं त्याचं भाषण उंच चाललं होतं, त्या भाषणाचा आवाज ओढाळ पाण्यासारखा भासत होता. साऱ्या नवीन अंतःकरणांना ते भाषण नवीन जाणिवांची चेतना देत होतं. लेनिनचे सारेच शद्ब जेव्हां तुमच्या अंतःकरणांत शिरतात आणि ते मनाची पकड घेतात तेव्हां ते ऐकणारांच्या मनावर कांहींतरी कसला प्रयोग करितात. आणि अशा रितीनं मुत्सद्दी लेनिन,

त्याच्या आठ्या पडलेल्या काळसर चेहऱ्यानं, त्याच्या सरळ नयनाच्या झाकीनं कीं जे डोळें खदीरांगासारखे आहेत कीं तपकीरी रंगाचे आहेत......

आपला गंभीर चेहरा घेऊन ॲण्ड्रोनिकोव पुन्हा पेचांत पडतो. त्याच्या अंतर्मनाला त्याच्या वैशिष्ठ्याची साक्ष न पटतां अगदीं सामान्य मानवी गुण त्याच्यात आहेत असं वाटतं. तो अगदीं आपल्या जवळचा आहे. जसा कांहीं लेनिन त्याला आपला वडील भाऊच वाटतो.

मध्येंच लेनिनच्या भाषणांत ॲन्ड्रोनिकोवच्या कानांत त्याचं एक वाक्य घुसलं, 'राष्ट्रांत जनतेचं राज्य आणणं अगदीं त्रासाचं काम आहे.' ॲड्रोनिकोवला वाटलं ते शक्य होईल का कीं, त्याच्या बरोबर त्याच्या सारखेच सारी माणसं मिळून आम्हीं आमच्या राष्ट्रावर सुखी जीवनाचं राज्य आणूं काय? आणि असा माणूस तपकीरी रंगाचा कोट घातलेला नि काळी हॅट वापरणारा लेनिन, काय त्याची ही प्रचंड शक्ती! ॲड्रोनिकोवला आठवण झाली अशा मार्गानं जणूं काय आपण रसरसलेला लोखंडाचा कढत कढत रस ओतीत आहोंत. पहिल्यांदा अतिशय गरम. नंतर मऊ. वाटेल तसा त्याला वाकवा. किती लवचीक! पण ओतल्यानंतर थोड्या वेळानं तो थंड होतो. आणि मग त्याला कापणं किंवा तोडणं किती त्रासदायक? तीच गोष्ट या स्वातंत्र्याच्या शक्तीची. ती या आगेंत नि ज्वालेंत निर्माण होते. मग ती थंड होते. आणि नंतर ती इतकी अभेद्य बनते कीं तिला निराळं करणं अशक्यच. मग स्वातंत्र्याचा फुलबाग नि समानतेचं अभेद्य शिखर!

थोड्या वेळापूर्वी लेनिननं आपलं भाषण संपविलं होतं. सैन्यांतून एक जण बोलत होता. त्याच्या भाषणांतली कांहीं वाक्यें ॲन्ड्रोनिकोवच्या कानांत निनादलीं गेलीं, 'आपण अभेद्य आहोंत. आपली शक्ति प्रचंड आहे. आणि हे आपलं लाल सैन्य म्हणजे अतिविशाल आणि प्रचंड अशी ताकत आहे.'

आतां या वेळांत सैन्याला आगेकूच करण्याची आज्ञा मिळाली होती. ॲन्ड्रोनिकोव जरा थकून गेलेला नि त्रासलेला मोटारींत बसला.

शोफर त्याला विचारूं लागला, 'कॉम्रेड, इल्यीच कशा प्रकारचा माणूस आहे ?'

'अगदीं कुणाहि सारखा साधा माणूस.'

'तो तसा नाहीं, कां नाहीं ?'

'कारण असं कीं तो तसा नाहीं .'

संध्याकाळीं ॲन्ड्रोनिकोवच्या सहकाऱ्यांनी त्याला निरोप देण्याकरितां बैठक बोलाविली.

आठ माणसं एका मोठ्या टीकवूडच्या टेबलाभोवतीं जमा झालीं. गाल्बिनहि तिथं होता. आणि ज्याच्याकडून मेजवानी मिळणार होती, तो काटकुळा फिकट चेहऱ्याचा, चेहऱ्यावर केसांची लव दिसून येणारा सुतार, आपल्या काळ्याभोर डोळ्याच्या नि खूप हंसणाऱ्या बायकोसह तिथं येऊन बसला होता. रोझीनेकोसुद्धां तिथेच बसला होता. दोन माणसं बाजूच्या कोचावर बसली होती. त्यापैकीं एक लहान वयाचा ज्यू होता. त्याचे डोळे घाणेरडे दिसत होते. त्या डोळ्यांना रंग नव्हताच आणि दोन्ही भुवयां वाकवून तो आपली विजार वर ओढण्याचे नि खाली सोडण्याचे चाळे करीत होता. त्याच्या बाजूला लेट्ट बसला होता. त्याच्या डोळयांत दु:खीपणाची झांक होती; तो लहान ज्यू लेटजवळ बसून त्याच्या गुंड्यावरून हात फिरवीत त्याला कांहीं-तरी सांगण्यांत गढून गेला होता—त्याच्यापासून थोड्याशा अंतरावर केस कापलेली, निळा पोषाक करून आलेली नेसमेलिनस्काया बसली होती. आणि तिच्यापासून थोड्याशा अंतरावर आपसांत कांहींतरी कुजबुज करीत दोन कामगार मुली बसल्या होत्या.

बाबेव खोलींत चकरा मारीत होता. त्यानं काळा शर्ट घातला होता. त्याचा एक हात कमरेवरच्या पट्ट्यावर होता तर दुसरा केसांतून फिरत होता. टेबलापासून बऱ्याच अंतरावर खिडकीपाशीं बार्तेनयाव कोणत्या तरी कामांत गढून गेला होता. तो पियानोवर पडलेलीं पुस्तकें, जोडे, बंदुकी आणि पट्टे बाजूला सारीत होता.

ॲव्ड्रोनिकोव आंत शिरल्यावर बाबेव म्हणूं लागला, 'तें सर्व खरं आहे पण पुन्हा हें लाल फीत.........आह !'

'मायकेल दिवोनिविच कसा आहेस तूं ? यावरून असं दिसतं कीं आपण दोघंहि बरोबरच जाणार आहोंत.' बाबेवनं ॲण्ड्रोनिकोवला पहातांच तो आपल्या सुतार मित्राला उद्देशून म्हणाला, 'नाहीं भय्या, मला सांगायचं आहे कीं म्युझिक ( जमिनदार ) कांहीं मूर्ख नाहींत. त्यांना आतां त्यांचे विरोधक कोण आहेत तें कळलं आहे आणि बोल्शेविकांचं तत्त्वज्ञान ते समजून चुकले आहेत.'

'पण ते खरंच पूर्णपणें समजून चुकले आहेत काय हें आपण पाहिलं पाहिजे. जेव्हांपासून ते सारखारवेका मार्केटमध्यें बेकायदेशीर व्यापार करण्या-करितां येत असत तेव्हांपासून ते कशातऱ्हेचे लोक आहेत हें आम्हीं जाणून आहोंत. गरीब लोक बिचारे !' आजची मेजवानी देणारा सुतार म्हणाला.

'हा कांही मुख्य मुद्दा नाहीं. ती बेकायदेशीर जाणीव गरजेंतून उत्पन्न झाली आहे. हृदयांतून नाहीं. ते मनानं आपल्या बरोबर आहेत. आणि गरजेचा प्रश्न उपस्थित केला तर आपण त्यांच्या बरोबर नाहींत. आम्हांला तर समजतहि नाहीं कीं आपण त्यांच्याशी कसं जमवूं ते !'

'नेहमी नेहमी तेंच. माहित नाहीं कसं करूं. १९१७ मध्यें हृदयद्रावक शद्बानं आम्हीं अर्ज केला होता, स्टेशनावर भाकरी पोंहोंचवा आम्हीं भुकेनं मरत आहोंत. म्युझीकनीं त्यावेळेस आमच्यापासून पाठ फिरविली. त्यावेळेस तुम्हीं असंच म्हणाला असतां माहित नाहीं कसं करूं. मग आम्ही चौकशीला सुरवात केली. त्यांनी भाकरी लपवून ठेवल्या होत्या. पुन्हा माहित नाहीं कसं करूं. हें पुढं आलंच असतं. तुम्हीं त्यांच्यापाशीं जेव्हा जेव्हां पोहोंचाल तेव्हां तेव्हां तुम्हीं असंच म्हणाल, माहित नाहीं कसं करूं.' पांढुरक्या चेहऱ्याच्या तो मुद्रक तावातावानं आपले हात हवेंत हालवीत तीं वरचीं वाक्यें बोलला.

बालपणापासून तो शहरांत आपल्या बापाच्या छापखान्यांत काम करित होता. त्याच्या बापानं सुद्धां मास्कोची भूमी कधीं सोडली नाहीं.

आणि म्हणून या शहरीं मुद्रकाला शेतकऱ्याबद्दल विशेष कांहीं जिव्हाळा नव्हता. पण बाबेव घर नसलेला प्राणी ! त्याच्या आयुष्यांत त्यानं पुष्कळदां म्युझिक लोकांशीं संबंध ठेवला होता. त्याला ते लोक जबाबदार वाटत असत. त्यांच्याबद्दल त्याला बंधुभाव वाटत होता. आणि म्हणूनच तो या संभाषणांत विशेष जोरांत होता.

'तूं मूर्खासारखं बोलत आहेस. एखाद्या पांढरपेशासारखें किंवा जमिन-दारासारखें तूं मुद्दे लढवीत आहेस. काय एक कम्युनिस्ट असं बोलूं शकेल ? तुला आणि मला शेतकऱ्याशिवाय अस्तित्व तरी कुठं आहे......समजलं तुला ?'

आणि त्या कोपऱ्यांतून जिथं लेट्रू आणि तो ज्यू बसला होता तिथून आत्मप्रचितीचा आवाज उंचावत होता. त्यांत आव्हानाचे शब्द होते.

'सोवोनास्कोम म्हणजे तरी काय कामकरी प्रधानमंडळाची समिति !'

'मग टेक्नीक पार्लमेंट तरी काय असून नसून सारखंच. कोणीहि काय त्याकडे आधिभौतिक दृष्टीनं विचार करावा. आपण मार्क्सवादी......'

या वेळांत बार्तेनयाव, ॲण्ड्रोनिकोव आणि रोझीनेको, त्यांच्यांत येऊन मिसळले होते. त्यांनी पियानो इतक्या जोरांत आपल्याकडे ओढून घेतला कीं त्या दोन कामगार मुली आपापसांत बोलत होत्या त्या भीतीनं एकमेकीकडे पाहूं लागल्या.

'माझा सारा विश्वास एकट्या इल्यीचवर आहे. बेस्तावनिकोवच्या शांतते-पासून माझा त्याच्यावर असीम विश्वास जडला आहे.' निळ्या पोषाकातली नेसमेलिनस्काया म्हणाली.

'इल्यीच, पण त्याबद्दल तर कोणीच वाद घालीत नाहीं.' ॲण्ड्रोनिकोवनं शेरा मारला.

बाबेव मध्येंच म्हणाला, 'पण तुम्हाला शेतकऱ्यांत मिसळून जाणारा असा खेळगडी मिळणार नाहीं.'

'तेहि खरंच आहे.' नेसमेलिनस्काया म्हणाली.

‘ पण तो त्यांना विचित्र तऱ्हेनं खेळवतो. तो एक सामान्य कामकरी या नात्यानं त्यांच्यांत जाऊन बसतो. ’ ॲण्ड्रोनिकोव पियानोचं पॅडिल नीट करीत त्या चौघांना उद्देशून म्हणाला.

‘ आणि तोच एक वाजवी मार्ग आहे...मित्रानों, मी एक तुम्हांला गंमत सांगणार आहे...’ असं म्हणत बाबेवन आपल्या कंबरेभोंवतालचा पट्टा आवळला. पुन्हां एकदा त्यानं डोक्यावरच्या केसांतून बोटें फिरविली आणि तो बोलूं लागला...अं....हो.

‘ एकदां मी लेनिनला पत्र लिहिलं होतं कीं शेतकऱ्यांत जाऊन अशा रितीनं काम करण्याची तऱ्हा कांहीं चागली नाहीं. असं मी लिहिलं. आणि अशा तऱ्हेनं मी सर्व कांहीं मुद्दे पुढें ठेवले. त्याकरीतां बरेचशे मार्ग सुचविले हें आणि तें. तें आणि हें. सर्व कांहीं. इल्यीच, तूं थोडंस चुकत आहेस आणि अशा-रितीनं आणि असंच. बरेच दिवस निघून गेले. आघाडीवर जाण्याच्या आधींच मी लेनिनला जाऊन भेटलों, त्याला भेटण्यांत थोडंस काम जास्त असं होतं कीं मला कर्नल मुरावीवबद्दल थोडंस त्याच्याशीं बोलायचं होतं. हो, तर काय मीं त्याच्याकडून आलों. तो या गोष्टीबद्दल नी त्या गोष्टीबद्दल बरंचसं बोलला. पण माझ्या पत्राचा त्यानं उल्लेख केला नाहीं. हें असं कां झालं ? असा मी विचार केला. पण त्याला पत्र मिळाल्याची माझ्याजवळ त्याची सही होती. शक्य असेल त्यानं तें वाचलं नसेल. बहुतेक नाहींच. तो तें वाचण्याचं विसरून गेला असावा. तो अतिशय कामांत होता. मला त्याच्याशीं त्याबद्दल थोडंस बोलावंस वाटत होतं. त्याच पत्रांत मी अगदीं सविस्तरपणें धान्य वाटणीच्या प्रश्नावर लिहिलं होतं. मी वेळांत वेळ काढून त्याला विचारलं, ‘ व्लादिमीर इल्यीच, माझं पत्र मिळालं काय ? ’ तो टेबलाच्या मध्यभागीं बसला होता. अन् मी जरा बाजूला; तो एकदम सारं शरीर वाकवीत माझ्याकडे वळला. त्याचं दळदार मनगट लिहिलेल्या कागदावर होतं आणि त्याचा चेहरा अगदीं माझ्या-जवळ आला. माझ्या चेहऱ्यावर तो प्रश्नार्थक दृष्टीनं बघूं लागला. आणि नंतर ती त्याची दृष्टी जी अगदीं साधी आहे नि तिला तुम्ही ओळखतां ती दृष्टी

माझ्यावर टाकीत तो म्हणाला, ' हो मला तें मिळालं. ' आणि असं म्हणून पुन्हा तो मागं खुर्चीत रेलला आणि दुसऱ्याच गोष्टीबद्दल तो बोलूं लागला. पण पत्राबद्दल एक शब्दहि नाहीं. थोडंस थांबून आणि तशी संधी बघून मी त्याला अडखळतच विचारलं, ' अन्....अं....तूं तें वाचलंस ? ' पुन्हा त्यानं पहिल्यासारख्याच दोन्ही नजरा माझ्यावर बदलल्या नि म्हणाला, ' हो तें मी वाचलं. ' आणि पुन्हा तो दुसऱ्याच गोष्टी काढण्यांत गढून गेला. बरं आतां कांहींच होणं शक्य नाहीं. समोरासमोर त्याला त्या पत्राबद्दल बोलायचं नसेल. नंतर मी त्याच्यापासून निघतांना तो मला अभिवादन करीत उठला. मी त्याच्याकडे पाठ फिरविली नि पुढचं दार बाहेर जाण्याकरितां उघडूं लागलों तोंच तो ' कॉम्रेड बाबेव, कॉम्रेड बाबेव. ' म्हणून मला बोलावूं लागला. मी परतलों. त्यानं माझा हात आपल्या हातांत घेतला नि म्हणाला, ' कॉम्रेड बाबेव, तुला माहित आहे; प्रत्येक गोष्टीबद्दल लिहायला आनंद वाटत असेल तर लिहित जा तूं, मला आनंद होईल तें वाचतांना. तुझीं पत्रें थेट मला मिळण्याची मी व्यवस्था करीन. अवश्य पत्रें पाठवित जा. ' आम्ही एकमेकांपासून मित्रत्वाच्या नात्यानं विलग झालों. तो मनुष्य आहे अशा प्रकारचा. मला वाटतं, मी त्याला जे जे कांहीं लिहितों तें तें तो चांगल्याच दृष्टीनं समजून घेतो. '

या वेळांत बाबेवनं कुलुपाशीं चाळा करून पियानो उघडला. तो वाजवूं लागला. सारी खोली एकदम लकाकूं नि निनादूं लागली. जणू काय तिच्यांत मोठमोठे दिवे आणून लावले होते. ' जनतेनं राज्य करणं म्हणजे हातात हात मिळविणं. सामायिक बंधुभाव दृढ करणं ' हा साधा विचार ॲण्ड्रोनिकोवच्या मनांत चमकला. त्या संगीताच्या माधुरीनं त्याला शिखरावर नेलं. उंच, अगदीं उंच. तेच ते शब्द तो आपल्या स्वतःशीं घोकूं लागला. त्यावेळेस त्याच्या मनांत काय विचार असतील हे त्याला स्वतःलाच कळत नव्हतं.

सुस्वर आवाज एकसारखा फैलू लागला. जणू काय तो त्यांच्या आत्म्यांना स्वर्गातली संजिवनी आणून देत होता.

त्या आवाजांत ॲण्ड्रोनिकोव ताळतंत्र नसणारीं वाक्यें घोकत होता, 'शौर्यानं ! जास्त आणि जास्त !'

आणि पडदे लावलेल्या खिडक्यांच्या बाहेर शांत आणि भयानक काळ-रात्र मास्को भोंवतीं गराडा घालीत होती. काळे बुरखे घालून शांतपणें ती हजारो धोकेबाज लोकांच्या वेषांत चाल करून येत होती.

कीर्र...किर्र....कीर्र...किर्र....

टेलीफोनची घंटी एखाद्या वेड्या माणसारखी त्यांच्या कानांत गर्जू लागली. आणि कॅलेंडरवरील ३० ऑगष्ट १९१८ चं पान वाऱ्यानं फडफडू लागलं.

'हॅलो !' तो म्हणाला.

'कुठं ! बॅस्मेनीकडे ?' ॲण्ड्रीला एकदम थरकांप सुटला. अश्रू भरून आलेल्या अन् फिकट पडलेल्या चेहऱ्यानं त्यानं विचारलं,

'हाय ! काय मिचलसन फॅक्टरीकडे ?...मी हा असाच येत आहे.'

वाद्यांचा आवाज या शद्बांच्या आवाजाबरोबर लुप्त झाला.

आणि ॲण्ड्रोनिकोव डोक्याला हॅट घालीत बाहेर निघतांना सर्वांना सांगण्याकरीतां येवढंच तुटक शद्बांत म्हणाला, 'ट्राटस्कीवादी आणि क्रांती-विरोधी बंडखोरांपैकीं....काप्लान् या बाईनं....लेनिनवर....गोळी....झाडली.'



# महापूर     ७

त्या अंधाऱ्या झोपडींत जवळच्या खेड्यांतून जे नातेवाईक आले होते तेहि संभाषणं ऐकण्यांत गर्क होऊन गेले. दारापाशीं थोडासा उजेड होता. तिथं पांच वर्षांचा लिओची आपल्या आईच्या मांडीवर डोकं ठेवून निजला होता. त्याची जावळं नुकतींच काढण्यांत आलीं होतीं. सर्वांप्रमाणें त्याचेहि डोळे एकाग्रतेनं कांहींतरी ऐकत आहे असं दिसत होतं. त्याला माहित नव्हतं आतां आपल्याला काय ऐकावं लागेल तें. आणि हें उघडच आहे कीं अशा विशिष्ट वेळेस कोणती गोष्ट करावयाची असेल तर ती म्हणजे श्रवणभक्ति.

जवळपास कुठंतरी कुत्रं भूंकूं लागलं. वारा उगीचचा जोरांत वाहूं लागला. अन् पानाची सळसळ होऊं लागली.

‘ थांबा, थांबा, तुम्हीं ऐकलंत कां ? हा कुणाच्या तरी रडण्याचा अस्पष्ट आवाज ऐकूं येत आहे. तिकडे बाहेर कुणी तरी जोरानं ओरडत आहे. ’

‘ मूर्ख, कांहीं तर ऐकूं येत नाहीं ! ’

'जरा थांबा कांहींतरी आवाज ऐकूं येतो हें नक्की.' थोडा वेळ स्तब्धता पसरली. म्हातारी आजी अर्धवट बहिरी. डोकीचे केस पिकून गेलेली आपले पडके दांत दाखवून बोलूं लागली,

'हे ईश्वरा, आतां आम्हीं काय करावं ज्योतिषानं सांगितलं कीं हे चालू वर्ष माझ्याकरितां संकटग्रस्त आहे ..यावेळेस इथं एखादं संकट तर उपस्थित होणार नाहीं ? महापूर ! कुणीतरी मला नेहमी वाचवित असतं. कारण मी पुष्कळशा मोठमोठ्या संकटांतून वाचले आहे. पण एकदम येणाऱ्या संकटाची कोण ग्वाही देणार बाई ! लक्षांत ठेवा मी मरणाला भीत नाहीं.

'आमची हीं जुनी हाडं मातीत जायला फार वेळ आहे. पण आमच्या मुलांना नि नातवांना जगविणं अगदींच कठीण काम होऊन बसलं आहे.

'मुलगा काय कीं नातू काय संकट हा असा भेदभाव दाखवित नाहीं. तें सर्वांना सारखंच लेखतं. आणि हीच सगळयांत अतिशय वाईट गोष्ट आहे.'

'कां ये-पोरा—चूप तर बैस—समज आजीनं ऐकलं तर.'

'आजीला झोंप येत आहे. हाई बहेन तिला हांथरूणावर निजव, लांब चालून आल्यामुळें ती थकून गेली असेल'

'झोंप. झोपेची वेळ झाली आजी.' बहीण तिच्या कानांत ओरडली.

'मूर्ख कुठली, माझ्याकरितां झोंप नाहीं. मी त्यांच्याकरितां वाट बघत आहे. किती वाजतां परत येतील ते ?'

'हें कुणास माहित ते कुठं गेलेत ते. आम्हाला कांहींच आवाज ऐकू येत नाहीं. रात्रीं कांहीं घडेल असं तुला वाटतं आजी ?'

'मी कसं सांगूं शकेन. मुलींनो ! भगवान बुद्ध सुद्धां तें सांगूं शकणार नाहीं.'

'बुद्धा ! त्याला धिक्कार असो ! आमचा विरोध करायला त्याच्याजवळ आहेच काय. महापूर, महापूर आणि महापूर. आणि इतकं असूनहि प्रत्येक

वर्षाला त्याची प्रार्थना! राक्षस कुठचा. आम्हांला पहिली गोष्ट करायची ती ही कीं, या ईश्वराची उचलबांगडी. आम्हीं खाड्या तयार तरी कां कराव्या; आणि ही साऱ्या रात्रीं जागरणं तरी कशाला? आंत व्हा. पाण्यासारखं वाहणारं हें रक्त! आंत व्हा. त्या बुद्धाला यांत बुडवून टाका. मी म्हणतों. आपल्या या शत्रूचे आधीं तुकडे तुकडे करा.'

' चूप बैस टाफू. कधींहि न दिसणाऱ्या गोष्टीवर कां रागावतोस.'

' हो, पण तो जें काय म्हणतो तें खरं आहे. पूर आणि महापूर. दरवर्षी त्याचीच पुनरावृत्ति!'

' एकापेक्षां दुसरा येथं आवरायला जड होऊं लागला आहे. जरा थांबा.' या सुचनेकडे कुणीच लक्ष दिलं नाहीं. ते सारेच कांहीं इतके बोलके नव्हते.

ती साधारण भीतीची वेळ आणि त्यांत थोडसं वैचित्र्य. यामुळें त्या दुहेरी हाडापेराच्या सशक्त स्त्रियासुद्धां बोलक्या बनल्या. त्या सर्वच एकदम किलबिल करूं लागल्या. मोठया मुलांनी आपल्या बापाबरोबर काम करायचं नाकारलं होतं. आणि ते या संवादांत मोकळेपणानं भाग घेऊं लागले. मध्यभागीं त्यांनीं त्या म्हातारीला संवाद चालू ठेवण्याकरितां बसविलं होतं.

' वर्षा आधींची ती गोष्ट आहे हें मला माहीत नाहीं. पण मला त्या प्रसंगाची आठवण आहे. त्यावेळेस हा लगहर लहान होता, तो माती खात असे. आणि जे हातांत मिळेल तें तो तोंडांत धरुन चोखीत असे. खरोखर त्या वेळेस मी कुटुंबा कुटुंबांतून वावरत असे. माणसांची संख्या कमी कमी होत होती. दुष्काळ रोगराई आणि जागोजागीं हाडाचीं सांपळी! कावळ्यांना सुग्रास अन्नाची मेजवानी! कितीतरी माणसं मेली. पण पहिल्यांदा माझा लहानभाऊ आपल्या आईची सुकलेली स्तनं चोखता चोखता मरण पावला. मग माझी बहीण गेली. मग काकी. नंतर काका सेन....मी त्या वेळेस सात वर्षांची होते. तेव्हांपासून आतांपर्यंत मी हजारों संकटांतून बचावले आहे.'

' तुमचा विश्वास बसेल? भिकारी बनले तरी भुकेनं मरण आलं नाहीं. गुलाम मुलगी म्हणून खूप मार खाऊन जगले. आतां मी साठीच्यावर कदाचित्

पासष्ट वर्षांची असेन. खरोखर अजुनहि मला त्या सर्व गोष्टींची आठवण होत आहे. लगहरला कडेवर घेऊन एखाद्या चिमणीसारखी मी उडून गेलें होतें. त्यावेळेसचा तो मोठा महापूर माझ्या आयुष्यांत मी प्रथम पाहिला आणि नंतर........'

लगहरला हें मुळींच आवडलं नाहीं आपली गट्टी एक म्हातारी, डोकीवरचे केस गेलेली बाई करत आहे हे त्याला कसंसंच वाटलं. तिचा बोल-तांना गडगडणारा आवाज ऐकून तो भ्याला अन् आपल्या भावाजवळ सरकला. लिओची अर्ध मिटलेल्या डोळ्यानं तिचे सारे हाव भाव बघत होता. तिचें तोंड भरून येणाऱ्या शद्बांच्या मान्यामुळें ती त्याला फारच विक्षिप्त वाटत असे. लिओचीला हंसावसं वाटत असे. पण त्याच्यावर हुकूम बजावला होता. अं हं. हुकूम नव्हे पण हवेंतली मूक खूण. कसं का होईना म्हणा पण तो हंसू शकत नव्हता.

खाड—खट्! बंदुकींतून गोळी झाडल्यासारखा आवाज ऐकूं आला. पण तसं कांहीं एक नव्हतं. दोन रिकाम्या वस्तूंची आपसांत टक्कर झाली असावी. किंवा कप खालीं पडला असावा. पण सगळ्यानीं एकदमच बोलणं थांबविलं.

आणि साऱ्या खोलीभर अगदी शांतता पसरली. या शांततेत आतां त्यांना बाहेरच्या वाऱ्यचा सूं-सूं आवाज ऐकूं येऊं लागला.

पुन्हा म्हातारी आजी स्वतःशीं पुढें बोलूं लागली, 'कुणाची चूक आहे ती कोण सांगेल? माझा नवरा चांगला विश्वासू नि स्वावलंबी होता. आणि मुलगाहि अगदीं थेट बापासारखा. ते दोघे कधीं एक दिवसहि बेकार राहिले नाहींत. आणि आतां ते दोघेहि मेले आहेत. हा काय न्याय झाला? स्वर्गातला ईश्वर कुठं आहे? माझ्या पुरती मी त्याची काळजी करीत नाहीं. माझं काय मसणी गवऱ्या गेल्या आहेत आता!

'पण तुम्हीं सारे तरूण आहांत. तुमचाहि शेवट त्यांच्यासारखा न होवो. मला कळलं, इतकं असूनहि तुम्ही आशा करीत रहाल........ मी तरूण असतांना साऱ्या जगानं माझ्याबरोबर पळावं असं मला वाटत होतं. तीं खट्याळ स्वप्नं ! मी सांगतें ऐका, नीतीनं राहाणं अगदीं वाईट......आणि मग मी मेल्यानंतर त्याचं काय ? जग त्याच त्या गोष्टी, तिच ती रूढी घेऊन पुढं चाललं आहे-फक्त कठीण, अगदीं कठीण !'

'कठीण, कठीण, कठीण, पण महाकठीण होणार आहे तरी केव्हां ? तशी अमोल्यसंधी अशी आलीच पाहिजे नाहीं ?'

बाहेर कुत्रा भूंकूं लागला. वाऱ्याच्या झोतानं एक कागदाचा कपटा उडत उडत आंत आला. आणि भिंतीला अटकून स्थिर झाला. लांबून चालत येत असलेली आकृती आतां अगदीं जवळ आली.

दारापाशीं एक मनुष्य येऊन उभा राहिला. ओळखीचा शद्ब काढून त्यानं कुत्र्याला चूप बसविलं.

आणि लागलीच तो खोलींत शिरला.

'ओहो ! हा तर सेनयाह. कशी आहे सर्व व्यवस्था. बांधाचं काम कुठपर्यंत आलं आहे ?'

तो आंत येतांच म्हणाला, 'काय या घरांत एकहि दिवा नाहीं, कुठंच प्रकाश नाहीं अगदीं.'

'तेलाचा एक थेंब सुद्धां नाहीं, दोन मेणबत्त्या आहेत पण त्या देवापुढं लावण्याकरितां राखून ठेवल्या आहेत.'

'बरं कसं काय आहे सर्व ? आम्हाला हळू बोलण्याचा आवाज कांहीं ऐकूं येत नाहीं. पूर ओसरून गेला आहे ना ?'

'ओसरला नाहीं. पण हा पूर नाहीं याच्या विरुद्ध म्हणजे आमचं अवसान ओसरण्याची वेळ आली आहे. काय तुम्हांला कधीं घंटीचा आवाज

ऐकूं आला नाहीं. या टँग खेड्यांवर संकटांची सरबत्ती सुरु झाली आहे नुसती !

' बांध अगदींच वाईट स्थितींत आहेत आणि त्यांची मजबूत बांधणी करायला फारच उशिरा सुरवात झाली आहे. एखाद्या इमारतींतल्या साऱ्या लोकांत हगवणीची साथ पसरली म्हणजे संडास बांधणीचं काम सुरू करावं ना तसं हें झालं आहे. समजलं मी काय म्हटलं तें तुम्हाला ? '

' मग इथं आमचं कसं होणार. '

' हो, खरंच आमचं कसं होणार; आम्हीं तिथून निघालों तेव्हां आमची जनावरें आम्ही तिथेंच विसरून आलों. मग उद्यां त्यांना परत आणण्याकरितां आम्हीं सकाळीं जावं कीं नाहीं ? '

' तें सागणं अगदीं कठीण आहे. टँग खेड्यावर जर पूर गेला तर इथं बाहेर आम्हीं सुरक्षित आहोंत. आणि आम्हीं तिथं जर पुरांत सांपडतों तर टँग खेड्यांत आसरा घ्यावा लागेल. आणि आम्हीं मरत असतांना तेथील लोक आम्हांला बचावण्याचे प्रयत्न करतीलच. '

' टाफू, हिरफू चला माझ्याबरोबर आम्हाला जास्त माणसं हवी आहेत. चला बरोबर आणि पहारा करा. जरासा बांधांत कुठं तडा गेला कीं आमचं काम खलासच. '

सेनयाह दारांत उभा राहिला. आणि संथ आकाशावर नजर फिरवूं लागला. तितक्यांतच एक पिळदार शरिराचा नि दाढीवाला माणूस मध्येंच म्हणाला, ' इतकी जलदी कशाची करतां. विनाकारण तुमच्या डोक्यांना कां शिणवितां ? '

' बरं तर चला आपण जाऊं या. ? अरे टामेवो तूहि पण चल. या तरूण मुलांचे डोळे फारच तीक्ष्ण असतात. लियोवोला जर बरं वाटत नसेल तर त्यानं येऊं नये. '

ते सर्वच मुलं बांधाच्या बाजूला जायला आतूर झाले. या बोलभांड बायकां-पासून दूर होण्याची ते संधी बघत होते. बांधावर जाण्याकरितां आपली जाकिटे

नि सदरे बघूं लागले. उन्हाळा होता. गारवा सुटला होता. पण आंग मोकळं ठेवून त्यांना बाहेर जावसं वाटत नव्हतं.

' पूर कसा असतो तो पाहिल्याशिवाय मला चैन पडणार नाहीं. '

' आणि एकदां तो पाहिला कीं पुन्हा तुला चैन पडणार नाहीं. कांहीं नाहीं नुसतं पाण्याचे अजस्त्र लोंढेच्या लोंढे इकडून तिकडे ढकलले जातात. मध्यरात्रीं तूं त्यांचा आवाज ऐकलास तर भ्याल्याशिवाय राहाणार नाहींस. '

धाडसी सिनयाहच्या बायकोनं मघाशीं बोलतांना ईश्वर नि जमीन यांतला फरक दाखविला होता. ती ठामेठोकपणानं बोलूं लागतांच इतर स्त्रियाहि तिचं म्हणणं ऐकू लागल्या.

' आतां किती वाजले आहेत—मीहि तुमच्या बरोबर चलणार आहे. तुमच्यामागें रात्रीं मी इथं राहाणार नाहीं. हें सारं घर भुतानीं भरलं आहे, खरंच मी तुमच्या बरोबर येणारच. '

' मूर्ख कुठली, तूं काय करणार आहेस तिथं ? घरीं बैस. लगहर नि चिंचूशीं खेळ. घरांतल्यापेक्षां बाहेर भूतं फार आहेत ' सिनयाहनं दमदाटी केल्यावर ती उठली नि चिंचूच्या मागें जाऊन बसली. बाहेरच्या थंड वाऱ्यांत टाफू आणि बाकीचे लोक निघून गेले. चंद्र आतां अगदीं उंचावर आला असावा. पण तो अगदीं ढगाच्या आंत झांकला गेला होता. ढगाच्या बाजूला तुरळक चांदीच्या कडा दिसत होत्या. पण लौकरच त्याहि दिसेनाशा झाल्या. त्यांच्या बरोबर दोन शिकारी कुत्रे होते. सगळीकडे अंधार पसरला होता. जणू काय त्याच्यापासून बाहेरचं सारं जग तुटून वेगळं पडलं होतं.

टाफू जिथं बसला होता ती जागा त्यानं साफसूफ केली. त्याला अगोदर बापाला हांक मारावीशी वाटली. नंतर त्याला वाटलं आपण भावाबरोबर गेलों असतों तर बरं झालं असतं. पण या दोन्हींपैकीं निश्चित असं कांहींच झालं नाहीं.

ते खाडीच्या बाजूला बरेच लांब निघून गेले होते. बांधाची जागा त्याच्या चांगलीच परिचयाची होती. तो दिवसभर तिथं होता. आणि त्यानं तें गढूळ पाणी वाहतांना पाहिलं होतं. त्याबरोबरच त्यानं किनाऱ्यावर खुर्च्या टेबलं मांडलेलीं, मद्याचं सामान, कोंबडीचीं अंडीं, कुत्रे, लोकाचं लांकडी फळयावर इकडून तिकडे पोहणं हीं सारीं दृश्यं त्यानं दिवसा बघीतली होतीं. त्या सर्व गोष्टींची आठवण करतांना त्याला मजा वाटत होती. तो त्यामुळें जेवण सुद्धां विसरून गेला. पण कांहीं असो. या भयाण रात्रीं त्याला त्यापैकीं एकाही वस्तूचा कुठं मागमूस दिसत नव्हता. अन् त्या नदीनं सुद्धां काळा-कभिन्न रंग धारण केला होता.

तिकडे झोंपडींत म्हातारी आजी पुन्हां बोलत होती,

‘ मी तुम्हांला सागतें मला माहित आहे. श्रीमंत लोक कांहीं महापूराला भीत नाहींत. आपण गरिब लोकच त्याला भितों. कारण आपण आपल्या जनावरासह त्यांत प्राणाला मुकतों. मला आठवतो तो पूर. मी चँगच्या घरांत गुलाम मुलगी म्हणून रहात असे. किती तरी भिकारी होते तिथं ! मी मोजायला चुकत असे. ते खरे खुरे भिकारी नव्हते. महापूरामुळें साऱ्या जीवनाची वाताहात लागल्यामुळें ते भिकारी बनले होते. आणि जामीनदाराच्या स्थितींत जो बदल झाला त्याबद्दल काय सांगूं. त्यावेळेस आमच्या मालकाचा तरूण मुलगा उंच जागेवर जाऊन मद्य पीत पुराची मजा बघत होता. त्याचं खरं कारण म्हणजे म्हाताऱ्या मालकानं जमविलेल्या धान्यावर सातपट आठपट फायदा खाल्ला होता. यावर विश्वास बसेल तुमचा ?

‘ श्रीमंताच्या हृदयांत ना मास असतं ना हाड. आणि आम्हीं आपली बुद्ध देवाची प्रार्थना करतों. मला आठवतं. मी आल्या दिवसापासून त्याची करूणा भाकत आहे. मला कुणीच मदत केली नाहीं पण श्रीमंत वरचेवर श्रीमंत बनत चालले आहेत. ते आपलं कुटुंब सुरक्षितपणें जागवूं शकतात. आणि त्यांच्या नि आमच्यात फरक तेवढाच आहे........’

अडगळीच्या खोलींतून एक उंदीर आवाज करीत इकडून तिकडे निघून गेला.

' पूर अजून आला नाहीं. पण हे सर्व उंदीर हालचाली करूं लागले आहेत. आश्चर्य आहे, या लहान प्राण्याच्या हालचालीवरून........चिन्ह वाईट दिसत आहे. माझ्यावर विश्वास ठेवा अगर ठेवूं नका एक वेळ अशी येईल कीं तशा गोष्टी घडतीलच. '

टेनिंग, नेहमीं घरच्या मंडळीत बसून निरनिराळ्या गोष्टी सांगत असे. तिनं वरचा मुद्दा काढला व त्यावर गोष्ट सांगायला सुरवात केली. तिला ती आठवत तर नव्हतीच. पण ती सांगितली जात असतानांच स्वतंत्रपणें तयार होत होतीं. फक्त एक लहान मुलगी तीं ऐकत होतीं. बाकीच्या बायका त्यांत विशेष लक्ष देत नव्हत्या. पण मधून मधून जे शद्ब ऐकूं येत होते त्यावरच त्या जोर देत होत्या. तिनं ती गोष्ट अर्ध्यावरच सोडली. आणि पुन्हां खोलींत सारी स्तब्धता पसरली.

तितक्यांत वाऱ्याचा एक प्रचंड झोत आला. अन् त्याबरोबरच कोरड्या मातीवर पाऊस पडला म्हणजे जसा सुवास सुटतो तसा सुवास सुटला. आणि बाहेर अगदीं अस्पष्ट आवाज ऐकूं येऊं लागला. बाहेर पाहिल्यावर त्यांना दिसून आलं कीं जळत्या मशालींचा तल्लख प्रकाश इकडून तिकडे फिरत आहे. आणि त्या बरोबर महापूरांतले झगडणारे लोक इकडून तिकडे चकरा मारीत आहेत. पण तें दृश्य पाहून त्यांना वाईट वाटलं, दिसत होते ते त्यांची बाहेर गेलेलीं माणसं होतीं. मजबूत बांध्याचे आणि त्यांच्या अगदीं जिव्हाळ्याचे ते लोक त्या महा-पूराशीं झगडणार होते. पण त्या मशालीचा सारा प्रकाश आतां बांधाच्या एका कोपऱ्यांत गेला. त्याना कांहींच दिसेना. बारीक सूरांत ओरडण्याचा आवाज ऐकूं येत होता. पण नंतर तो आवाजहि ऐकूं येईनासा झाला. फिकट दिसणाऱ्या चंद्राप्रमाणें त्या साऱ्या बायकांचे चेहेरे फिकट दिसत होते. थोडावेळ वाऱ्याशिवाय कांहींहि ऐकूं आलं नाहीं. आणि अंधाराशिवाय

कांहीं दिसलं नाहीं. तिथं असं गूढ आणि गंभीर वातावरण पसरलं होतं. लागलीच पटांगणांत कुत्र्याचं भुंकणं ऐकूं येऊं लागलं आणि त्याबरोबरच एक व्यक्ति दिसली आणि त्यामागें दुसरी, तिसरी, चौथी, ते अगदीं जवळ आले तेव्हां समजलं कीं येणाऱ्यापैकीं दोन स्त्रिया व दोन मुलें आहेत.

‘ आमच्यावर आतां दया करा, नव्या मेवोतनं खेड्यांत आतां आम्हांला थारा नाहीं. ’

‘ नवं मेवोतन ? परवा जिथं महापूर आला तेच खेडं काय ? ’

‘ हो तेंच. तें पन्नास साठ मैल लांब आहे. खालच्या पाठारावर आहे तेच ना ? ’

‘ आंत या जवळ बसा. काय झालं तें सांगा. ’

त्या मेवोतन खेड्यांतल्या स्त्रिया आंत आल्या आणि त्या मुलांनीं प्रवासाच्या श्रमामुळें थकून गेल्यामुळें आंत येतांच जमिनीवर आंग टाकलं.

‘ परवां रात्रीपासून पाऊस जोरांत सुरू झाला होता. आमचं घर पावसांत भिजून गेलं. पसारा आवरायला सुद्धां वेळ मिळाला नाहीं. आमची चिमुकली मातीची घरं त्या भयंकर पाण्यापुढं टिकाव धरूं शकलीं नाहीं ! आमचे शेजारी तर आमच्या पेक्षांहि बिकट अवस्थेंत सांपडलें आहेत आम्हांला दोन दिवसांपासून पोटांत पाणी घ्यायला सुद्धां आधार मिळाला नाहीं—’

‘ गरिब बिचारे ! शोधते हं. आमच्याजवळ कांहीं असलं तर. तांदूळ असतील थोडेशे ? ’

‘ तुमची माणसं कुठं आहेत ? आतां तुम्हीं जाणार कुठं ? आणि काय नवं मॅवोतन अजूनहि पाण्यांत आहे—? ’

‘ त्याबद्दल काय सांगावं; त्यांना राहायला जागा नाहीं, खायला अन्न नाहीं, ल्यायला कपडे नाहींत अन् काम धंदाहि नाहीं. ’

' बरं जिथं कांहींच नाहीं तिथं ते थांबले आहेत. याचा अर्थ असा कीं त्यांना जगावंस वाटत नाहीं. पाण्यांनीं सगळं धान्य वाहून गेलं आहे पण जमिनीखालीं शांतता आहे. आणि म्हणूनच ते जिवंत राहूं शकत नाहींत. '

' तुम्हीं कुठं जाणार आहांत ? '

' आम्हांला हिच्या उयाशान खेड्यांत जायचं आहे. ही माझी मेव्हणी आहे. पण सकाळीं आम्हांला कळलं कीं उयाशान खेडयांतहि तसलाच प्रकार घडला आहे. रस्ते बंद झाले आहेत. देव जाणे. आम्हीं तिथं कसं पोहचूं शकूं तें. आमचीं माणसंहि घरीं असलाच विचार करीत असतील कीं आम्हीं उयाशानला दाखल होऊन गेलों म्हणून.' शेवटीं त्या अननुभवी नि तरूण स्त्रिया या भयंकर हलाकीच्या स्थितीची जाणीव नसल्यामुळें रडूं लागल्या.

' आम्हांला वाटतं, आम्हीं जिथून आलों तिथंच पुन्हां परत जावं हें चांगलं. '

' मग दुसरा उपाय काय शोधावा. तोंपर्यंत आम्हाला इथं थारा मिळेल ?.......'

' अं हं. तसं संरक्षण इथंहि मिळणार नाहीं. आमची घरचीं सारी पुरुष मंडळी बांधावर गेली आहेत. आणि उद्यां जग कसं दिसेल याची आम्हालाहि कल्पना नाहीं. '

' देवा, देवा, समजा आम्हीं इथंच अडकलों गेलों तर आमचीं माणसं समज करून घेतील कीं आम्हीं उयाशानला गेलों आहोंत म्हणून. ' ती रडत आणि हुंदंका देत म्हणाली.

म्हातारी आजी तर ऐकूं शकत नव्हती पण हें अश्रू बघितल्यावर तिनं आतुरतेनं विचारलं, ' ही काय भानगड आहे. खरंच का कांहीं वाईट गोष्ट घडली आहे बायानों ? '

तिला कुणीच उत्तर दिलं नाहीं. तिच्याकडे कुणी बघितलंहि नाहीं. प्रत्येकीचं हृदय दोरीनं बांधल्यासारखं घट्ट बनलं होतं. आणि प्रत्येकीचे डोळे

बाहेरच्या अंधारांत फिरकत होते आणि लगदीं त्याच वेळेस मोठमोठ्यानं घंटीचा आवाज ऐकूं येऊं लागला

घण....घण....घण ण ण...बांधावरून शेतांत आवाज ऐकूं येऊं लागला. धोक्याच्या सूचनेनं सारे लोक झोपडीच्या बाहेर पडले. जनावरं सैरावैरा पळूं लागली. आणि पक्षी उडूं लागले. सर्व खेड्यांत धावपळ सुरु झाली. क्षितीजावर जाड जाड मेघाच्या काळया भोर रेघा दिसूं लागल्या. स्त्रिया भराभर बाहेर पडत होत्या. अन् बाहेरच्या पटांगणांत येऊन जमा होत होत्या. त्या म्हाताऱ्या आजीशिवाय प्रत्येकजण बाहेर निघालं होतं. उतावळ्या लोकाचा जमाव जमला होता. मुल रडत होतीं. कुत्रीं विव्हळत होतीं. आणि हें सर्व चाललं असतांना घंटीचा भयाण आवाज चाललाच होता आणि त्या बरोबर लोकांच्या मोठ-मोठमोठ्यानं ओरडण्याचा आवाज त्यांत मिसळला जात होता.

' बांधाकडे चला, बांध वाचविलेच पाहिजेत. पुरुषांनीं घरांत थांबू नये. कुणीहि पळून जाऊं नका ! सगळेच चला, बांधाकडे चला. '

' मशाली आणा ! दिवे पेटवा ! ' पिसाळल्याप्रमाणें कुत्रीं भुकूं लागलीं. कावळे आक्रोश करूं लागले. आणि ओरडण्याचा, घंटाचा नि वाऱ्याच्या सळसळाटाचा सारा आवाज खाडीवरच्या काम करणारांच्या कानांत आदळूं लागला. महापूराशीं ते प्रतिकार करीत होते. नदीच्या किनाऱ्यावर मशालीची एक रांग बनली. आणि एका निराळयाच उत्साहानं ते सर्व लोक तिथं काम करूं लागले.

' हे इश्वरा आमचं संरक्षण कर ? हे अ-मि-टे-फू आम्हाला वाचव ! वरूणा थांबव. हा महापूर थांबव. ' कुणी तरी गुडघे टेकून प्रार्थना करीत होतं. मुंगीची रीघ लागावी त्याप्रमाणें खेडयांतले लोक जमा झाले. पण जितके जास्त प्रमाणांत तिथें ते संघटित झाले तितक्या प्रमाणांत त्यांना संकटाची भीती कमी वाटूं लागली. पण मुलं रडूं लागलीं, कुत्रीं अगदीं विव्हळूं लागलीं. स्त्रिया अश्रू गाळूं लागल्या, आणि घंटीचा आवाज उंच उंच जाऊं लागला. मशाली जास्त शिलगल्या गेल्या.

‘ बांधाकडे चला बांधाकडे चला. खेडयाला वाचवा. आपल्या लोकांना वाचवा. आपल्या कुटुंबाला वाचवा ’

‘ बंधुनो, त्वरा करा. वेळ दवडूं नका. मशाली जास्त पेटवा. त्या उंच धरा. ’

माणसांचा एक प्रवाहच नदीच्या किनाऱ्यावरचा चिखल तुडवीत आणि मशालीचा उजेड उंच उंच धरीत चालला होता. ताबडतोब माणसांची दुसरी एक तुकडी तिथं आली आणि त्यामुळं त्यांची हिंमत जास्त वाढली. त्याच्या कामांत जास्त तत्परता आली. रात्रीच्या भयाण अंधारांत आतां जास्त मशाली-मुळें प्रकाश चोंहींकडे पसरला.

जोरानं वाहणारा वारा हळू हळू वाहूं लागला. आतां चंद्र ढगाबाहेर आला. झाडाच्या पानांतून तो दिसूं लागला. चंद्र प्रकाश शेतींतल्या कोवळ्या धान्यावर पडूं लागला. आणि सगळीकडे हिरवीं हिरवीं माळरानं दिसूं लागलीं.

‘ लियोओ ! नको, कुठं चालला आहेस ? ’

‘ हरकत नाहीं. मी आतां इथं किती वेळ थाबणार ! मीहि त्या काम-कऱ्यांत जाऊन सामील होणार ! ’

‘ मी सुद्धा येतों कीं ! ’

ते उतावरून खालीं आले. त्यांचे केस उडूं लागले. नंतर आणखी कांहीं माणसांची तुकडीहि आली. आणि त्यांच्यामागें स्त्रियाचं रडणं ऐकूं येऊं लागलं. सावलीच्या हालचालीबरोबर त्या खेडूत स्त्रियाहि आपापल्या घरांच्या भिंतीशीं वर खालीं जाणाऱ्या मशालीप्रमाणें अधिरतेनं वर खालीं हालचाल करीत होत्या. पण इतक्यांत सावल्या मावळल्या. त्या स्त्रियाहि आपल्या हातांत हत्यारें घेऊन बांधावर काम करणाऱ्या लोकांत मिसळून गेल्या. पाणी एकसारखं वाढतच होतं.

आतां आकाशांत चंद्रकोर अगदीं वर दिसत होती आणि पाण्याच्या पूराबरोबर वर आकाशातहि चादण्याला पूर आला होता.

आता आल्हाददायी वारं सुटलं होतं आणि शेतावरच्या कोवळया धान्या-वर तें वारं वहात होतं. संघटित शक्तीनं संकटावर विजय मिळाला होता. बांधानं महापूराचं संकट परतून लावलं होतं.

'—आणि जोतिषानं तर भाकीत केलं आहे कीं हें वर्ष अतिशय कठीण जाणार ?' म्हातारी आजी बसल्याजागीं स्वतःशींच पुटपुटली.



# पतंग     

पेकिंगमध्यें वसंत ऋतूंत जमिनीवर बर्फ माखलेला असतो. आणि वर स्वच्छ आकाशांत झाडाच्या काळ्या कुळकुळीत डहाळ्या स्वैरतेनं हवेंत डोलत असतात. हवेंत पतंगाचं परिभ्रमण चाललेलं असतं. अशावेळेस मनाला एक प्रकारच्या गंभीर विचारांची ओढ लागते.

माझ्या राहत्या शहरांत पतंग उडण्याचा मोसम वसंताच्या दुसऱ्या महिन्यांत सुरू होतो:-तुम्हांला वादळाचा आवाज ऐकूं आला तर तुम्हीं आकाशाकडे बघा, गर्द हिरव्या व निळ्या ठिपक्याचे पतंग असतात. ते हवा नसली कीं जमिनीच्या बाजूनं एकएकटे खालच्या बाजूला उड़त असतात. अशा वेळेस उंच उंच झाडांचीं कोंवळीं पालवी नवरंगानं चकाकत असतें. निरनिराळ्या रंगाची पिचफुलें आकाशाच्या रोखानं अशी विकसीत झालेली दिसतात कीं जणू काय त्यांनीं लहान लहान तारकांचं जमिनीवर आकाश बनविलं आहे. पण मी आतां आहे कुठें ? माझ्या सभोंवतीं तर हिवाळा पसरला आहे. तरी पण माझ्या आयुष्याचा वसंत आणि माझ्या शहरांतलं ते प्रिय घर वर आकाशांत विहार करीत आहेस भासत आहे.

मला स्वतःला पतंग आवडत नाहींत, ते मला त्रासदायक वाटतात. माझ्या मतानं ते एक लहान मुलांचं खेळणं आहे. या बाबतींत माझा लहान भाऊ विरुद्ध असे. त्याला ते भारी आवडत असत. तो दहा वर्षांचा असतांना अगदीं आजारी नि रोडका होता. त्याला पतंग आवडत पण कागदी पतंग तर त्याला विकत घेतां येत नसत. आणि माझ्या बरोबर त्याला खेळण्याचीहि परवानगी नसे. तो अर्धा अर्धा दिवस आकाशाकडे तोंड वासून पहात उभा राहत असे. आणि वादळाच्या झोतानं थोड्याशा अंतरावर एखादा गडद रंगाचा पतंग खालीं पडला कीं तो हर्षानं ओरडत असे. शेपटा असलेले पतंग जोडण्यानं त्याला आढळले कीं तो टाळ्या वाजवीत आनंदानं हुदडत असे. मी माझ्या गंभीर मनोवृत्तीनं त्याला एक मूर्ख मुलगा म्हणून ठरविलं होतं.

एके दिवशीं माझं मलाच वाटूं लागलं कीं, मी त्याला कांहीं चांगलं ओळखलं नाहीं. नंतर मला आठवण झाली. मी त्याला एकदा बागेच्या मागच्या बाजूला किडके बाबू निवडतांना बघितलं होतं. मला वाटलं कांहीं तरी गोष्ट घडत आहे. अडगळीचं सामान ठेवलेल्या फर्निचरच्या मध्य भागीं एका लहान स्टूलावर तो बसला होता. अन् समोरच्या ऊंच स्टूलावर कशाचा तरी शोध लावण्यांत तो गढून गेलेला दिसत होता. मला बघतांच तो घाबरला आणि उभा राहिला. भीतीनं त्याला थरकांप भरला होता. त्याच्या समोरल्या स्टूलावर मेलेल्या फुलपाखरांची पंखें होतीं. ती पंखे एकमेकाला चिकटलीं होतीं. त्या बाजूला दोन लहान पवन चाकं होतीं जसं कांहीं ते त्या पतंगाचे डोळे समजून चाकानां लाल कागदानं मढविलीं होतीं आणि बहुतेक सारं काम संपत आलं होतं. मी त्या नादान मुलाच्या खोडकर वागणुकीचा शोध लावला म्हणून मला आनंद होत होता. तो माझ्या माघारीं असले उद्योग कां करीत असावा याचा मला उलगडा झाला. अशी सुंदर सजीव फूलपाखरें नि पतंगाचा नाश करून आपलं खेळणं बनविणाऱ्या माझ्या लहान भावाचा मला राग आला. मी त्याच्या हातून ते पंख हिसकावून घेतले. पवन चाकं पायाखालीं

कुचलून टाकलीं. मी वयानं नि शक्तीनं जास्त होतों म्हणून मला विजय मिळाला. तो अगदीं हिरमुसला होऊन गेला मी अभिमानानं तिथून परतलों. नंतर त्याचं काय झालं तें मला कळलं नाहीं व ते कळवून घेण्यांत मी लक्षहि घातलं नाहीं.

कांहीं असो त्याबद्दल शिक्षा मिळण्याचा दिवस आलाच शेवटीं. आम्हीं एकमेकापासून दूरदेशीं होतों. मी प्रौढा–वस्थेंत असतांना पर भाषेतलं लहान मुलाबद्दल एक पुस्तक माझ्या वाचनांत आलं आणि मला समजलं कीं, तसल्या प्रकारचे खेळ आणि खोडकर व व्रात्यपणांची वागणूक–लहानपणीं साजेशी असते. तसले खेळ हेच त्याचे देवदूत आहेत. नंतर त्या बालिश कृतीचा नाश करून मी आत्मिक विजय कसा मिळविला तें वीस वर्षांपूर्वीचं दृष्य माझ्या पुढं उभं राहिलं. माझं हृदय एका पत्र्याच्या तुकड्यासारखं झालेलं वाटलं. आणि तें जडपणानं पाण्यांत खालीं खालीं जावं त्याप्रमाणं मला वाटूं लागलं. पण तें पूर्णपणें बुडत तर नव्हतं फक्त खालीं खोल खोल जात आहेसं वाटत होतं.

मी ती चूक कशी सुधारुन घ्यावी हें मला कळत होतं. मी त्याला एक पतंग पाठवूनहि दिला असता. त्याला प्रोत्साहन देऊन खेळण्याला मदतहि केली असती किंवा याहिपुढें जाऊन म्हणजे मी स्वतः त्याच्या बरोबर खेळलोंहि असतों. म्हणजे त्याच्या इच्छेप्रमाणें घडलं असतं. मग आम्हीं ओरडलों पळालों अन् हसलोंहि असतों. बरं पण गंमत अशी कीं, तोहि या वेळांत इतका मोठा झाला असेल. त्याला दाढीसुद्धां आली असेलच. पण ती चूक सुधारायला फारच उशीर झाला. एकच मार्ग होता. मी त्याची शद्वानं माफी मागायची. मग त्यानं म्हणायचं, ऊं जाऊंदे रे तें. आणि मला वाटलं, त्यानं असं म्हटलं कीं माझ्या चुकीची दुरुस्ती खासच होईल.

पण प्रत्यक्षांत त्याची व माझी जेव्हां गांठ पडली तेव्हां आमच्या चेहऱ्यावर जीवनांतले कठीण भाव कोरले गेले होते.

माझं हृदय त्या पत्र्यासारखं पुन्हां खोल जाऊं लागलं. हळू हळू आमच्या गप्पांचं वारं बालपणाच्या विषयावर वाहूं लागलं. शेवटीं मी हिय्या करून मागच्या त्या प्रसंगाची त्याला आठवण करून दिली नि म्हणालों, ' मी कबूल करतों कीं माझ्या तारूण्यातली ती चूक होती. ' पण तो ह्यावर ऊंः जाउंदे रे ते ! असं म्हणेल व माझ्या चुकीची तो क्षमा करील अन् मग माझं हृदय आनंदानं फुलेल असं मला वाटलं पण............मी सांगितलेली सर्व गोष्ट त्यानं अशा रितीनं ऐकली कीं जणू काय ती दुसऱ्याचीच आहे. त्याला त्याबद्दल कांहींहि आठवण उरलेली नव्हती.

पूर्ण विस्मृति. तिरस्कार तर नाहींच आणि माफीहि नाहीं. कशातऱ्हेनं मी त्याची माफी मागूं ? या साऱ्या गोष्टींची अनिवारता माझ्या कल्पनेसमोर उभी राहिली. आणखी जास्त मी कशाची आपेक्षा करूं ? माझ्या स्मृतींत तेंच ओझं वागविणं मला भाग होतं.

आणि पुन्हा या अपरिचित प्रदेशांत वासंतिक वारं वाहूं लागले कीं माझ्या राहात्या शहरांतल्या वासंतिक स्मृती वर उसळूं लागतात. बाळपणीच्या मधुर लिला अशाच आठवणी करून देतात. आणि तोच वसंत असल्या हरवलेल्या मनाची अन् असुखी विचारांची सरभेसळ निर्माण करतो. अरे ! पण हें काय ?

तो वसंत कुठें आहे ? माझ्या भोंवतीं तर हिवाळा पसरला आंहे. कडक थंडी भासत आहे. अंः हं म्हणूनच तर मी म्हातारपणाच्या थंडींत वसंत ऋतूच्या स्मृतीनं आयुष्यांत माधुरी आणीत आहे.

---

# सामायिक स्त्री ⁘ · · ९

[ १९२६–२७ च्या हिवाळ्यांत कॉमिंगतानच्या राष्ट्रीय क्रांतिवाद्यांनी उत्तर चीनवर मोहीम केली होती. त्या घटनेवर ही खालील गोष्ट आधारली आहे.

कांहीं काळ चीनमध्यें कॉमिंगतान आणि कम्युनिस्ट पार्टींत सहकार्य होऊन उत्तरेकडल्या भांडवलदाराविरुद्ध युद्ध पुकारलं होतं. पुष्कळसे कम्युनिस्ट कॉमिंगतान पार्टी ( लोकपक्षा ) चे सभासदहि होते. पण १९२७ च्या एप्रिलनंतर कॉमिंगतानच्या उजव्या गटानं जनरल चँग कै शेकच्या नेतृत्वाखालीं क्रांति–विरोधी चळवळ सुरू केली. पुष्कळशा कम्युनिस्टांनां त्यानं हाकलून लावलं व कांहींना ठार केलं. हॉन-कॉंगच्या राष्ट्रीय सरकारला हाणून पाडून त्यांनीं लाल सेनेविरुद्ध व त्याच्या डाव्या गटांविरुद्ध उघड उघड युद्ध पुकारलं.

याच ऐनजिनशीच्या काळांत सामायिक स्त्री ही गोष्ट लिहिली गेली आहे. बालसैनिकांची फौज ही राष्ट्रीयवादी लाल फौज आहे तिचं राजकारण कम्युनिस्ट पार्टीशीं जोडललं आहे. त्यानीं शेतकऱ्यांना बरींचशीं आश्वासनं दिलेलीं असतात. पण ती पूर्ण करण्याकरितां ते आतां कांहीं खेडयांत राहूं शकत नाहींत. कारण कुवोमिनतांग पार्टीची सेना खेडयांत येते. त्या सेनेचा सेनानी फेंग–युसेंग असतो. तो लष्करशहा असतो अन् त्यानं चैंग कै शेकच्या क्रांतिविरोधी चळवळींत उघडपणें शिरून अधिकाराची जागा पटकावलेली असते. फेंग–युसेंग त्या खेड्यांत येतांच हांगलिओ–लीथला ठार मारण्याची आज्ञा करतो. आणि त्याचप्रमाणें जे खेडुत कम्युनिस्ट पार्टीशीं संबंध ठेवीत असतील अशानां केवळ संशयावरून ठार मारलं जातं. ]

त्या भयाण रात्रींतून कोल्ह्याच्या कोल्हेकुईसारखा मशीनगन्सचा आवाज निघत होता.

सकाळी उजेडायच्या थोडंसं आधीं सैनिकांनीं भरलेल्या लॉऱ्या देवळांत येऊन उतरल्या. पण त्यांतले सैनिक कुणाच्या बाजूचे होते हें कुणासच कळलं नाहीं. ते गडबडीनं देवळांत शिरले. आणि ते थकून गेलेले दिसत होते. देवळांत शिरतांना ते मोठमोठाल्या पेट्या आत नेऊन ठेवीत होते. त्यांच्या उभ्या असलेल्या मोटारींतून गिरणीसारखा घर्र घर्र आवाज निघत होता. थोड्या वेळानंतर विजय मिळण्याची शिकस्त केलेल्या खेडुतांचा घोळका माघार घेतल्यामुळें साऱ्या खेड्यात इतःस्ततः फैलावूं लागला.

बाहेरच्या बाजूला सात वाजेपर्यंत गोळीबार चालू होता. सकाळच्या उजेडांत रस्त्यांवर तीन माणसांची प्रेते दिसलीं. धान्याच्या कोठारांना आग

लावण्यांत आलीं. आणि त्यांच्या घरांपाशीं नागव्या स्त्रियांची प्रेते दिसलीं. त्यांचे चेहेरे काळे ठिक्कर दिसत होते. आणि त्यापैकीं एकीचा पाय धडापासून अलग झाला होता.

अर्धा तास निघून गेला आणि नंतर खेडयाच्या तीन्ही बाजूनीं त्या विजयी लाल सैनिकांनीं, अगदीं घाणेरडे आणि काळजीनं खंगलेले दिसत होते अशा खेडुतांना धिमेपणानं शांत केलं त्यांच्या बचाव करण्याच्या योजना आंखल्या गेल्या. त्यांनीं जागोजागीं संतरी पाठविले. आणि ते स्वतःहि फिरूं लागले. कांहीं घोडेस्वारांनीं देवळाजवळ येऊन भिंतीवरील सरकारी दिवाल-पत्रिका काढून टाकल्या आणि पांढऱ्या कागदांवर लालभडक अक्षरांत छाप-लेली एक दिवालपत्रिका डकविली. चार सैनिक तिथं पहारा देऊं लागले.

नंतर एक वैचित्र्यमय थारेपालटीला सुरवात झाली. पुष्कळशे युनिफार्म घातलेल्या पण निःशस्त्र सैनिकांनी झोपडयांतून लहान लहान पत्रकें वाटायला सुरवात केली. आणि हांका देऊन सारं खेडं गजबजून टाकलं. त्यांनीं प्रत्येकाच्या घरीं जाऊन लोकांना घराबाहेर निघायला सांगितलं. हिरव्या पोषाखात अस-लेल्या एका सैनिकानं तोंडाला लोखंडी मॅग्‌फोन लावून मोठमोठ्यानं आवाज द्यायला सुरवात केली.

हळू हळू बंद खिडक्यांची तावदानं उघडून पिवळ्या चेहऱ्याच्या लोकांनीं डोळे फाड फाडून आपल्या दारावर टिक् टिक् करणाऱ्या लोकांना निरखिण्यास सुरवात केली. त्याची जेव्हां खात्री पटली किं बोलायला आलेले लोक वाघाच्या कातडयाचे युनिफार्म घातलेले लोक आहेत व ते सशस्त्र नाहींत तेव्हां सारे खेडूत आपापल्या मोडक्या तोडक्या झोपड्यांतून बाहेर येऊन जमूं लागले. आणि कांहीं अंतरावर—मॅग्‌फोन मधून बोलणाऱ्या त्या तरुणाचं ते भाषण ऐकूं लागले.

कांहीहि असो पण मॅग्‌फोन मधून जें भाषण बाहेर पडलं होतं त्यांतला शब्द न् शब्द त्यांना विचित्र वाटला. असले शब्द सैनिकाकडून येतील अशी त्यांनां आपेक्षा नव्हती. त्यांना सर्वांना त्याचं शेवटलं वाक्य कळलं. ' आम्हाला

मुळींच भिऊं नका ' पताके आणि निरनिराळ्या रंगांत छापलेल्या ध्येयवाक्यांची कागदं त्यांना मिळाली. भाषण संपल्यानंतर ते घरीं परतले. या नवीन प्रयोगाचा त्यांच्या मनावर परिणाम झाला.

हॅंग-लि-ओ लीथ आणि त्याचीं दोन मुलं चिखलाच्या थोराळ्यापाशीं बसून हळूं हळूं बोलूं लागलीं. म्हातारा हॅंग म्हणाला, ' मुर्खांनों आतां चीनमध्यें लोकसत्ताक राज्य होणार !

' चीनमधल्या राज्ययंत्रापेक्षां ही राज्यव्यवस्था छानच असणार. साम्राज्यशाहीचं हें सोळावं वर्ष आहे. आणि प्रत्येक वर्षी नव्या वर्षाप्रमाणं सोहळा गाजविला जातो. आम्हीं अगदीं कंटाळून गेलों आहोंत. आतां त्या साऱ्या गोष्टी नाश होण्याचं हे शेवटलं वर्ष आहे. मागच्या वसंत ऋतूंत व्यु-पी-फूची फौज आली नंतर फेअनतीनचं सैन्य आलं आणि आतां......पण. ' असं म्हणून त्यानं एकदम आपलं तोंड बंद केलं. मान वर करून त्यान चोहोंकडे बघितलं. आपलीं गाऱ्हाणी कुणी ऐकलीं कीं काय म्हणून त्याला भीति वाटली.

शेजारच्या मातीच्या भिंतीवर डकविलेल्या कागदाकडे हॉंगचं लक्ष गेलं. जवळ जाऊन ते बघितल्यानंतर त्यानं ते सर्व वाचायचा प्रयत्न केला. चाळीस वर्षांआधीं प्रवेश परिक्षा पास व्हायच्या वेळेस त्याला शिष्यवृत्ति मिळाली होती. नंतर तो शाळामास्तरहि होता. त्याला अक्षरं लागत होतीं पण कागदावर कांहीं नवे नवे प्रकार घडलेले दिसत होते. त्याला त्यातलं अजून पुरेसं कळलं नव्हतं.

त्याचा मुलगा लिओसेन, त्यानं बापाची नक्कल केली. त्यानं मोठ्या मुष्किलीनं दोनच अक्षरं ओळखिलीं.

' किसान आणि संघ ' आणि दुसऱ्या पत्रकात रात्रीं ज्या धान्याच्या कोठारांना आग लावण्यांत आली होती त्याचा निर्देश होता. त्या पत्रकाचं नांव होतं ' सांघीक उत्कर्ष ' लिओसेन हॅंगचा लहान मुलगासुद्धां यांत भाग घेऊं लागला. तो गुराखी होता आणि लहानपणी एकसारखा गवत कापण्याच्या कामावर असल्यामुळें त्याला मुळाक्षरें शिकण्यास वेळच मिळाला नाहीं. पण एका

दिवालपात्रिकेवर एका अद्यावत मुलीचं चित्र होतं. तिची नाजूक छाती, सुंदर चेहरा, आणि तिनं दोन हात पुढे फैलाविले होते. त्याला त्या चित्रांत विशेष आकर्षकता वाटली.

म्हातारा हॉंग स्वतःशीं पुटपुटतच ओरडला ' अरे बापरे ! काय हे चित्र. याचा अर्थ असा कीं आतां सामायिक स्त्री उपभोगण्याचा जमाना येऊन पोहचला आहे तर ! ' अगदीं जवळ जाऊन त्यानं बघितलं, गोऱ्या गोऱ्या दंडाची ती मुलगी चार पाच माणसांच्या मध्यभागीं उभीं होतीं. तिच्या चेहऱ्यावर मित्रत्वाच हास्य होतं. आणि तिनं उजव्या हातांत एका माणसाचा नि डाव्या हातात दुसऱ्या माणसाचा हात. अभिवादन केल्याप्रमाणें तसाच धरिला होता. पहिल्यांदा बापानं चित्र पाहून सुचविलेल्या कल्पनेचा धक्का लिओसेनला सुद्धां जाणवला. पण त्या चित्राचा त्याला बापाइतका कांहीं तिटकारा वाटला नाहीं. त्याला समाधान वाटलं कीं चला माझी बायकोहि मागच्या वर्षी जात राहिली आहे. आणि माझा बाप म्हणतो तशी कांहीं नवीन संधी आलीच, तर या नवीन स्त्रियापासून मनसोक्त मजा लुटायच स्वातंत्र्य तरी मिळेल.

' बाबा, जरा मोठ्यानं बोला अडखळत बोलूं नका. नाहींतर ते लोक आपल्याला संशयावरून धरतील. कांहीहि असो ही सामुदायिक पत्नीची कल्पना कांहीं वाईट नाहीं. आपलं त्यांत नुकसान काय होणार. आणि सध्या सुदैवानं आपल्या घरांत एकहि स्त्री नाहीं ? '

म्हातारा चमकून भीतीनं त्याच्याकडे बघूं लागला. आणि नंतर त्यानं लहानग्या लिओचीकडे बघितलं. कांहीं तरी बोलून मुलांना गप्प बसविण्याची त्याची इच्छा होती. पण बाजूनं कोणी तरी येत आहे असा त्याला सुगावा लागला. आणि त्यांच्या शांततेनं गंभीर स्वरूप धारण केलं.

घण......घण......घंटीचा आवाज येतांच ते उड्या मारीत पळूं लागले. कदाचित् आपली अंधार कोठडींत रवानगी होईल म्हणून ते भ्याले. पण पुन्हां ते घरांत जात नाहीं तोंच दाराशीं आणखीन आवाज ऐकूं आला. लिओची

आंत गेला आणि त्यानं फाटक लावून घेतलं. बाहेर एक विद्यार्थी सैनिक होता. आणि त्याच्या बरोबर चेहऱ्यावर देवीच्या खुणा असलेल्या खेडूतांचा जमाव होता.

ते आंत आले नि तो सैनिक हसूं लागला. ' हा ' याचं नांव हॉंग लीओ-लीथ. आमच्यामधला हा एक सुशिक्षित माणुस आहे. म्हाताऱ्या हॉंगची ओळख करून देत एक खेडूत म्हणाला. ' फार छान तुम्ही आतां आमच्या-बरोबर चला. सैनिक हॉंगला उद्देशून म्हणाला.' म्हाताऱ्या हॉंगची ओठं थरथरा कापूं लागलीं. त्याच्या तोंडून शद्बहि निघाला नांहीं.

देवीचे व्रण असलेला एक मनुष्य म्हणाला, ' खेड्यांची व्यवस्था लावण्याकरिता अधिकाऱ्यांना खेड्यांतल्याच लोकांची आवश्यकता आहे. त्यांना शिकलेल्या माणसांचा गरज आहे!' आणि आपल्या जवळच्या कागदाचा निर्देष करून देत तो म्हणाला, ' हा छापलेला मजकूर सर्व लोकाना समजावून सांगितला पाहिजे. '

' मी म्हातारा-अगदीं-म्हातारा आहे. माझे डोळे धड बघूंहि शकत नाहींत. मी या कामाला कांहीं योग्य ठरणार नाही. ' हॉंग लीथ म्हणाला. त्याला या कामापासून दूर राहण्याची इच्छा होती. आणि असा ठाम विचार करूनच तो बोलला होता. पण शेवटीं तो त्यांत खेचला गेला. लिओसेन त्याच्या मागें मान खालीं घालून उभा होता. लिओची काहीं तरी विचित्र घडेल हें बघण्याकरीता त्यांच्या मागोमाग चालू लागला.

थोडक्यात सांगायचं म्हणजे किसान संधाची व्यवस्था करण्यात आली. आणि हॉंग-लिओ-लीथ किसान संघाच्या नोंदणी कचेरींत प्रत्येकाच्या नावाची यादी करण्यांत गढून गेला. त्याच्या बाजूला १७ वर्षांचा नवयुवक युनिफॉर्म घालून बसला होता. त्या तरूणाला हॉंग-अधिकारी समजत होता. त्याच्याचकडून या नवीन नवीन कल्पनांची अंमलबजावणी केली जात होती. जे जमिनदार पळून गेले होते त्यांच्यावर टेहाळणी करण्याकरितां कांहीं

तरूण युवकांस त्यानं पाठविलं होतं. आणि घरीं लपून बसलेल्या साऱ्या खेडू-तांना तो बाहेर काढून या नवीन संस्थेचे भराभर सभासद करून घेत होता.

लिओचीला तो युवक फारच मजेदार वाटला. पण त्या सामायिक स्त्रीची उणीव अजून त्यानं कांहीं भरून काढली नव्हती. त्याला वाटलं कदा-चित् लोकांना जाळ्यांत ओढण्याकरितां हे अस्त्र त्यानं वापरलं असावं. खेड्याच्या बाहेर मशिनगन्‌चा नि बॉम्बचा आवाज आतां थांबला होता. आणि सारे आलेले सैनिक माघारी फिरले होते. फक्त चारच सैनिक देवळाच्या दारापाशीं उभे होते. आणि त्यांच्या बरोबर दहा इतर माणसें होतीं. शिस्त राखण्याला सुरवात झाली. आतां कांहीं सैनिक मुली रस्त्यावर येऊन पत्रकें वाटूं लागल्या. 'युनियनला संघटित करा' जमलेले सारे खेडूत मोठ्यानं ओरडूं लागले. एके दिवशीं पांच सहा बालसैनिक तिथं आले. बाकीच्याप्रमाणें त्यांनींहि हिरवा युनिफॉर्म घातला होता. पण वयांत न आलेल्या मुलाप्रमाणें त्यांचा आवाज कोमल होता. ते आले नि सरळ झोपड्यांत घुसले. आणि तेथील मुलींना आणि बायकांना काहीतरी नम्रपणानं समजावून सांगू लागले. साऱ्या खेड्यांत एक बाजारी थाप पसरली. आणि ती इतक्या प्रमाणात कीं हे बालसैनिक दुसरे तिसरे कोणी नसून साऱ्या मुली आहेत आणि त्या केवळ स्वतःच्या युनियनमध्यें येथील स्त्रियांना सामायिक स्त्रीचं शिक्षण देण्याकरितां दाखल करून घेत आहेत.

साऱ्या खेड्यांत एक नवीनच वातावरण पसरायला सुरवात झाली तरूण माणसं इकडून तिकडे निरनिराळ्या बातम्या पसरवित फिरूं लागली.

लिओचीनं काहीं लष्करी स्त्रियावर तसल्या प्रकारचा प्रयत्नहि करून पाहिला. आणि आश्चर्यानं पुढं होणाऱ्या हालचालीची तो वाट पाहत राहिला.

त्या देवीचे व्रण असलेल्या लीओच्या घरीं सात आठ खेडूत जमा झाले. कम्युनिस्टांस मदत केल्याबद्दल त्यानीं राग जाहीर केला.

'वा. रे. वाः! तूं अशी हमी दिलीस कीं हे सारे लोक कम्युनिस्ट आहेत. पण बघा घडत आहे काय तें? स्त्रियांचं समायीकरण ही त्यांची पहिली पायरी! त्यांतून काय मिळणार आहे?' '

' तुला बायको आहे. बरं चल तिला सामायिक बनव बरं आधीं. ' खरं सांगायचं म्हणजे लीओला बायको होती. ती देखणी होती. ही बाजारी गप्प खरी समजून भीतीनं ती जनावरांच्या गोठांत जाऊन लपली होती.

अजून दुपारहि झाली नव्हती कीं हॉंग-लिओ-लीथ घरीं पोहोंचला. तो आपल्या मुलांस शिव्या मोजूं लागला, ' तो देवीच्या व्रणाचा मुलगा होय, तोच या सर्वांना कारणीभूत आहे. आणि कदाचित् तुम्ही दोघानीं त्याला मथवून, मला या भानगडींत पडायला लावलं असावं. माणसांची संघटना करणं हें काम चांगलं आहे. पण आतां ते बुद्धीपुरःस्सर स्त्रियाना जमवूं लागले आहेत. बायकांना सामायिक करणं ही पहिली पायरी आहे. उशिरा किंवा लौकर साऱ्या वस्तूंचं समायीकरण होईल. हे ईश्वरा ! असं जर झालं तर आकाश कोसळून पडेल. या गोष्टींचा नुसता विचार करणं म्हणजे माझ्यासारख्या पवित्र माणसांवर केवढं पाप आहे. ईश्वर मला क्षमा करील. पण हे खेडूत ? ते शक्य नाहीं ! '

लिओसेननं बोलण्याकरितां तोंड उघडलं. पण तो कांहीं बोलूं शकला नाहीं. लिओची वाकडया नजरेनं कुठं तरी बघत ते भिंतीवरलं गोऱ्या गोऱ्या दंडाच्या मुलीचं चित्र आठवूं लागला. त्याला आश्चर्य वाटलं स्त्रियानां समायिक करणार तरी कसं ? आणि त्याला त्या रात्रीच्या स्वप्नांत हा प्रश्न सोडविण्याचे किती तरी मार्ग दिसले.

लिओ-लीथच्या तरूण कम्युनिस्ट अधिकाऱ्याला स्त्रियांना सामायिक करण्याची खेडयांत विचित्र तऱ्हेनं पसरलेली बातमी कळली. त्यानं साऱ्या खेडूतांची सभा बोलावली. तो अर्धा तास मान वर करून नि घसा ओरडून ओरडून बोलला. त्यानं सांगितलं कीं, ' सामायिक स्त्रीची ही गप्प पांढरपेशा नि खुशालचेंडू लोकांकडून आपल्या विरुद्ध गैरसमज पसरविण्याकरितां उठविली गेली आहे. ही थाप निरर्थक आहे. आणि आपल्या महत्तम कार्याशीं तिचा कांहींहि संबंध नाहीं. ' नंतर कांहीं स्त्रीसैनिकांनीहि त्यावर भाषणं दिलीं.

टीकेचा एक ब्रहि न काढतां साऱ्या खेडूतांनीं तें ऐकलं. ते पूर्णपणें या गोष्टीशीं संमत झालें नव्हते. कारण घरीं पोंहोचतांच त्यांनीं दारं नि खिडक्या लावून आंतून कुलुपं ठोकलीं. आणि पुन्हां एकदां त्यांच्या स्त्रिया ठिकठिकाणीं जाऊन लपल्या.

एके दिवशीं कांहीं दहाच्यावर आडदांड खेडूत त्या चित्रांच्या खालीं एके ठिकाणीं जमले. सूर्य अगदीं प्रखर तापला होता. वारा धूळ उडवीत चालला होता. आणि सगळ्यांचे कपडे धूळीनं भरले होते. त्याच्यापैकीं एक अरुंद चेहऱ्याचा मनुष्य, ज्याला सैतान हें नांव बहाल केलं होतं, तो एका मोठ्या झाडाच्या खोडावर पाठ टेकून बसला होता. आणि वर बघत रागानं बोलत होता. ' ही यांचीं आश्वासनं मी सांगता ही सर्व .माणसं अगदीं धोका देणारीं आहेत. एक बिघाभर जमीन देणारा तर अजूनहि मला कोणी भेटला नाहीं. मग आम्हांला मोठमोठीं शेतें मिळणार कशी ? '

' बेशरम कुत्रे, ते सुद्धां उरलेल्या पैकींच ! त्यांची युनियन-नि त्यांचे सारे पूर्वज खड्यांत जावोत ! आणि ह्या प्रखर भाजणाऱ्या सूर्याखालीं आम्हीं तसेंच राहून. त्यांचे बाप कष्ट करून अन्न मिळवीत आहेत. आणि हे त्यांचा फायदा आमच्या जवळून अशा प्रकारें घेत आहेत. '

त्यांच्यापैकीं कुणीतरी म्हणाला, ' नाहीं नाहीं ते कांहीं इतके अविश्वासी नाहींत. पण लिओची म्हणतो कीं त्यानीं देवळांत केलेले प्रकार त्यानं अगदीं उघडया डोळ्यानं बघितले आहेत. ते असे ढोंगीपणानं वागत असतील तर आमचा त्यांच्यावर विश्वास तरी कसा बसावा ! ' एक तरूण मनुष्य जो साधुसारखा दिसत होता, तो भिंतीला आपलं डोकं घाशीत डोळे मिचकावीत म्हणाला, ' त्यानीं आम्हांला मजेदार मेजवान्या दिल्या तर आम्हीं त्यांना खुल्या मनानं मदत करूं. '

दुसरा म्हणाला, ' पण तिथं सामायिक स्त्रिया नसल्या तर त्या पांच सहा लष्करी स्त्रिया असतील त्यांना घेऊन आपण करणार काय ? त्या सैनिकांनीं त्यांना आपल्या पुरतच सामायिक करण्याचं ठरविलेलं दिसतं. आणि त्यानीं आम्हांला नकार दिला तर ते माणूस बाह्य वर्तन घडणार नाहीं काय ? '

सारे जण मोठमोठ्यानं हसूं लागले. आणि त्यांना त्या तिसऱ्या भूकेनं पछाडलं.

' चला सारे जण मिळून आपण तसा प्रयत्न करूं. आपण-स्त्रीशिवाय कितीतरी दिवस राहिलों. आतां आपली वेळ आली आहे. जो मनुष्य आम्हांला येऊन मिळणार नाहीं त्यांला आम्हीं नामर्द समजूं.' सैतान उड्या मारूं लागला नि मजेत येऊन हसूं लागला. हे वरचे हिंमत देणारे शद्ब त्याच्या हृदयात जाऊन भिडले. त्याला कांहीं तरी बोलायचं होतं पण जोराच्या वावधानामुळें त्याचे ते शद्ब हवेंत विरले.

यांत शंकाच नाहीं कीं या बदमाशांच्या कटाची बातमी लिओचीकडून फुटली. त्या स्त्रीसैनिकांनीं लौकरच ते खेडं सोडलं. हाँग लिओचीला तो अधिकारी दिसला नाहीं. बहुतेक खेडुतांचा जीव खालीं पडला.

अशा रितीनं कम्युनिस्ट सेना उघडपणें हारूं लागली. या घडलेल्या प्रसंगामुळें सैतान आणि त्याचे साथीदार–विशेष–जोरानं काम करूं लागले. अजूनपर्यंत त्यानीं उघडपणें कांहींच सांगितलं नव्हतं. कुणालाच माहित नव्हतं कीं देवीच्या व्रणवाल्या लिओला कुणी मारलं. बाकीच्या खेडुताना वाटलं कीं आपल्याचपैकीं कुणी तरी त्याला त्याच्या निष्काळजी वागणूकीवरून मारलं असावं. दुसऱ्या कांहीं जणांना वाटलं कीं हा सर्व जो त्रास होत आहे तो त्याच्या बायको ,ळें होत असावा.

नंतर घरांत हांथरूणाची चोरी झाली. ही कोणी केली ? प्रत्येकाला शंका आली कीं हे सर्व कृत्य करणारे आपल्याच खेड्यांतले लोक आहेत. पण म्हाताऱ्या चँगनं एक चकार शद्बहि काढला नाहीं.

हाँग–लिओ–चीथवर आतां नवी नवी संकटं कोसळूं लागलीं. तो रस्त्यावरून जात असतांना त्याच्याशीं कुणीच बोलेनासं झालं. एवढंच नाहीं तर सगळे त्याच्याकडे तिरस्काराची दृष्टी टाकून चेहरे वळवूं लागले.

एके दिवशीं देवळाजवळ असलेले ते चार लाल सैनिकहि निघून गेले. आणि ही गोष्ट खरोखरच अगदीं गंभीर घडली. निरनिराळ्या प्रकारच्या अफवा

खेडयांत पसरूं लागल्या. त्याबरोबर लोकांच्या आपसांतल्या भांडणाच्या, जीं भाडणं कुणींहि पाहिलीं नाहींत त्याबद्दलहि निरनिराळ्या बातम्या पसरल्या. आणि अशा रितीनं नवीन संघटित झालेल्या खेडुतांवर आपत्ति ओढवूं लागली. या आपत्तीला कारणीभूत सैतान होता. पण तो नंतर दिसेनासा झाला. रात्रीं कुठं तरी मोठा जाळ दिसला. आणि जाळ विझविण्याच्या निमित्तानं चोऱ्याहि झाल्या. एका माणसानं देवळावर निखारा ठेवला आणि हळूच दबक्या पावलानं झोपडींत येऊन निजला.

सकाळीं खेडयाच्या एका टोकांत उत्तरे कडून फेंग युसेंग हा लष्करशहा आपल्या कांहीं फौजा घेऊन आंत शिरला. आंत येतांच अधिकाऱ्यानं हुकूम सोडला कीं खेडयांतले जमिनदार आणि प्रमुख लोक यानीं भेटीला यावं. पण वयोवृद्धांपैकीं कोणीच सांपडलं नाहीं. पत्रकं वाटणाऱ्या सशस्त्र सैनिकांची तुकडी काम करीत असतानांच लष्कर जोरांत हालचाल करूं लागलं. पण त्यावेळेस म्हातारा–हाँग आजारी पडला होता. आणि प्रश्नांची उत्तरें द्यायला तो जाऊं शकत नव्हता. शेवटीं चँग–ज्याची चोरी झाली होती त्याला समन्स सुटलं.

त्याच्या वाटेकडे सर्वांचे डोळे लागले. लागलींच हाँग–लिओ–लीथच्या घरांवर कांहीं सैनिक चालून आले. त्यांनीं त्याला उठण्याबद्दल हुकूम बजावला. आजारी असूनहि त्याला ऐकावं लागलं. त्याचा मुलगा लिओसेन, त्याला सुद्धां जावं लागलं. हाँग–लिओ–लीथ भीतीनं कापूं लागला. पण तो त्या जागेपाशीं आला. तिथं त्याच्या ओळखीचा राष्ट्रीय कुवोमिनतांगचा झेंडा फडकूं लागला होता. त्याच्या हृदयांत नवीन धडकी भरली.

मिसरूडसुद्धां फुटली नव्हती अशा एका कोवळ्या वयाच्या सशस्त्र अधिकाऱ्यानं त्याला दटावून विचारलं, ‘ तूं कोण आहेस ? ’ हाँग–लिओ--लीथनं त्याला खरं खरं सांगितलं. लिओसेनकडे बोट दाखवीत त्यानं विचारलं, ‘ हा तुझा मुलगा आहे ? आणि दुसरा मुलगा कुठं आहे ? ’

‘ हो, पण लिओची काल रात्रींपासून घरीं आला नाहीं. ’ म्हातारा म्हणाला. कांहींतरी उलगडा झाल्यामुळें अधिकारी हंसला. त्यानं सैनिकावर दृष्टी टाकली. नि हातांत आपला रिव्हॉल्व्हर घट्ट धरला.

हॅांग–लिओ–लीथ त्या दोन सोजीराबरोबर एका कॅम्पकडे वळाला. हॅांगनं कम्युनिस्टांना मदत केली म्हणून, आणि लिओसेननं खेडयांत जाळपोळ केली या संशयावरून त्यांना बुद्धिपुरःस्सर ठार मारण्यांत आलं.

नंतर दुपारीं खेडुतांची तपासणी करण्याकरितां कांहीं सैनिक पाठविण्यांत आले. त्यांनीं धान्याचीं कोठारें तपासली. त्यांना देवीच्या व्रणाच्या लिओकडून जनावरें मिळाली. चॅंगच्या बळदांतून अतोनात धान्य मिळालं आणि निर-निराळ्या झोपडयांतून पुष्कळशा वस्तू मिळाल्या. आतां खेडुतांना सारं कांहीं कळलं. त्या सशस्त्र सैनिकांनीं साऱ्या खेडयांतल्या वस्तूवर हुकूमशाही गाजविली.

लिओचंचे कपडे रक्तानं माखले होते. तो जवळच्या जंगलांत आपलं डोकं हातांत धरुन पडला होता. त्याला आपलं शरीर खालींवर धडपड करीत आहे असं वाटलं. कांहीं वेळ त्याच्यासमोर तीच चित्रातली गोरी मुलगी आपले दोन्ही हात पसरवित हासत आहेशी दिसत होती.

तीच मुलगी तो त्या लाल सैन्यात सारखा शोधीत होता. अति लगट केल्यामुळें लाल सैन्यांतल्या एका मुलीनं त्याला त्याची गोड कल्पना प्रखर वास्तवतेंत पटवून दिली होती.

उठून बसला कीं त्याच्या दृष्टीसमोर तीच मुलगी येत होती–आणि तसला विचार येतांच तो पश्चात्तापानं आपलं डोकं बडवीत, ' अरे बापरे ' अरे बापरे ! ' म्हणत होता. सामायिक स्त्रीची हूल गावांत पसरविण्याची, सैतानाला साथ दिल्याची नि व्रणवाल्या लिओला मारून त्याच्या बायकोवर अतिप्रसंग करण्याची त्याला राहून राहून आठवण होत होती. त्याच्या मनात विचारांची घालमेल चालली होती अन् एकीकडे मृत्युची हांक ऐकूं येत होती.



---

**टीपः**—या गोष्टीच्या सुरवातीस कॉमिंगतान या शद्वाच्या ऐवजीं कुवोमिनतांग असा शद्व वाचावा.

या पुस्तकांतील:—



संदर्भाकरितां—


1—International omnibus vol. II

2—Bonfire

3—Stories out of Soviet Russia

4—Flying osip (stories of new Rnssia)

5—Living China